मंगलमूर्ति श्री गणेशाच्या
कृपेनें उमललेलें
श्री विजय प्रकाशनचें
हें प्रथम पुष्प
मंगलमूर्तीच्या चरणीं
# अर्पण

## दुर्वांकुर

श्री गणेशासंबंधीं गतवर्षी श्री दीपलक्ष्मी मासिकात मी एक लेख लिहिला. त्या लेखाचें वाचकाकडून ज्या उत्साहानें स्वागत झालें त्यावरून लोकाना या विषयाबद्दल बरेंच औत्सुक्य आणि जिज्ञासा आहे असें आढळून आलें. भारताच्या सांस्कृतिक इतिहासाबद्दल वाचन करताना एलिस गेटी आणि डॉ. संपूर्णानंद याचे 'गणेश' हे अनुक्रमें इंग्रजी आणि हिंदी ग्रंथ मला विशेष आकर्षक वाटले. आणि श्रीगणेशासंबंधीं असा ग्रंथ मराठींत लिहावा अशी इच्छा झाली. म्हणून मराठी भाषेंत गणेशासंबंधींचें वाङ्मय पाहिलें. त्यात गणेश आणि मुद्गल पुराणाच्या भाषांतराखेरीज डॉ. स. कृ. फडके आणि पं. सातवळेकर याची पुस्तकें महत्त्वाचीं वाटलीं. पण डॉ. फडके याची मांडणी सगळीच वेदान्तपर आहे आणि पं. सातवळेकर यानीं गणेश पुराणातील कथाचीच मांडणी आपल्या राष्ट्रीय दृष्टिकोनातून केलेली दिसली. यामुळें श्री गणेश देवतेसंबंधीं सर्वांगीण विचार करणारें पुस्तक मराठी भाषेंत हवें आहे असें वाटू लागलें.

श्रीगणेश देवतेचें सर्वांगीण दर्शन घडावें हा या पुस्तकाचा हेतू आहे. कथाच्या दृष्टीनें पाहिलें तर श्रीगणेशासंबंधींच्या सर्व पुराणातील कथा आणि लोककथा येथें आढळतील. संशोधनाच्या दृष्टीनें पाश्चात्य आणि पौर्वात्य पंडिताच्या सिद्धान्ताचा आढावा येथें घेतलेला सापडेल. हिंदु धर्माप्रमाणें बौद्ध आणि जैन धर्मातील श्रीगणेशाचें स्थान, भारताबाहेर गणेश देवतेचा झालेला प्रसार, तन्त्रशास्त्रातील वैशिष्ट्य, भारतात काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत पसरलेलें त्याचें माहात्म्य या सर्व विषयाची ओळख येथें होईल. तथापि, या पुस्तकाचें स्वरूप केवळ संकलनात्मक

नसून भारतीय संस्कृतीचे श्री गणेश हें मूर्त स्वरूप आहे, हा विचार अनेक विद्वानाच्या मताचा समन्वय करून मी माडला आहे. इतिहासाच्या दृष्टीनें हा विषय प्रचंड आहे. भाडारकर-केतकराच्या महाराष्ट्रात विद्वत्तेच्या दृष्टीनें हा विषय माडण्याचा अधिकार मला आहे असें मी मुळींच मानीत नाहीं. सामान्य वाचकासाठीं माझा हा खटाटोप आहे. पण विद्वान पंडितानींही हा प्रयत्न कितपत साधला आहे हें पहावें अशी माझी त्याना विनंती आहे. गणेश देवतेबद्दल आध्यात्मिक दृष्टीहि मला मान्य आहे. ही आध्यात्मिक दृष्टी ऐतिहासिक दृष्टीशीं विसंगत किंवा विरोधी आहे असें मला वाटत नाहीं. याचीं कारणें पुढच्या विवेचनात आढळतील.

ज्या अनेक ग्रंथाचा उपयोग हें पुस्तक लिहिताना मला झाला त्याचा उल्लेख प्रत्यक्ष विवेचनातच जागोजागीं केलेला आहे. त्यामुळें संदर्भ ग्रंथाची वेगळी यादी देण्याची आवश्यकता मला वाटत नाहीं. मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयानें मला मुक्तद्वार ठेवल्यामुळे वेळोवेळीं संदर्भ काढणें सोयीचें झालें. त्याबद्दल संग्रहालयाचा मी ऋणी आहे. हें पुस्तक प्रसिद्ध करताना अनेक मित्राचें हार्दिक साह्य झालें आहे. माझ्याकडून विलंब होऊनहि पुस्तकाच्या प्रसिद्धीला गणेश चतुर्थीचा मुहूर्त साधला याचें श्रेय राष्ट्रवैभव प्रेसला आहे.

जाहिरातींचें निमित्त करून या उपक्रमाला ज्यानीं आर्थिक सहाय्य केलें त्या सर्वांचा मी आभारी आहे. बलवंत पुस्तक भाडाराचे श्री. अण्णासाहेब परचुरे यानीं पुस्तक विक्रीची जबाबदारी घेऊन मला निश्चिंत केलें आहे अखेर, श्री. गजानन काशीनाथ रायकर याचे आभार शब्दानीं मानतां येण्यासारखे नाहींत. कारण पुस्तकाची कल्पना निघाल्यापासून पुस्तक तयार होईपर्यंत जें जें उणें पडलें तें तें त्यानीं पुरें केलें आहे

गणेशचतुर्थी
शके १८८१
जोगेश्वरी

पु. रा. बेहेरे



# मंगल–मूर्ति

श्रीगणेशायनम ही आपली सुरवात आहे कोणत्याहि गोष्टीचा प्रारंभ म्हणजे 'श्रीगणेशा'. विद्येचा प्रारंभ आपण श्रीगणेशापासूनच करतों. 'आरंभीं विनंती, करूं गणपती, विद्या दयासागरा। अज्ञानत्व हरोनी बुद्धि मति दे आराध्य मोरेश्वरा' ही आपली प्रार्थना आहे. कारण गणेश हा विद्येचा सागर आहे, आणि दयेचाहि सागर आहे. म्हणून या विद्यादायकाचें प्रथम स्मरण करतात.

ग्रंथारंभीं गणपतीचें स्तवन करायचें ही प्रथा प्राचीन आहे. व्यासांनीं तर महाभारत लिहिण्यासाठींच गणपतीची प्रार्थना केली. कारण व्यास सांगू लागल्यानंतर त्या वेगानें लिहून घेणारा लेखक गणपतीशिवाय दुसरा कोणीहि सापडणें शक्य नव्हतें आणि गणपतीची लेखणी न थांबतां त्याला मजकूर सांगत रहाणें हें व्यासांशिवाय कोणाला शक्य झालें नसतें. म्हणून लिहायचें तें अर्थ समजून

लिहिलें पाहिजे अशी अट व्यासानीं घातली. खुद्द गणेशालाहि क्षणभर डोकें खाजवावयाला लागेल असे कूट श्लोक त्यानीं मधून मधून तयार करायचे आणि गणपती त्याचा अर्थ लक्षात आणीपर्यंत आणखी अनेक श्लोक रचून ठेवायचे अशा तऱ्हेनें व्यासानीं महाभारत पुरें केलें. व्यासानीं यावेळीं ८८०० गूढ अर्थाचे श्लोक रचले असें सौतीनेंच महाभारतात सांगितलें आहे. गायत्रीतंत्र शंकरानीं सांगितलें आणि गणपतीनें लिहिलें. असें हें गजकौतुक आहे. ग्रंथारंभीं गणेशवंदनाची प्रथा व्यासानीं सुरू केली असें मात्र नाहे. कारण आजकाल सर्व लेखक ग्रंथारंभीं गणेशवंदन करतोच असें नाहीं त्याप्रमाणेंच कालिदासानेंहि तें पूर्वी केल्लें दिसत नाहीं.

श्रीगणेश विद्यादाता आहे असेंच मानतात तो विद्यादाता कसा झाला ? विद्वानानीं याबद्दल निरनिराळे तर्क केले आहेत. गणेश हा सिद्धि आणि बुद्धि याचा पति आहे. मग सिद्धि आणि बुद्धि प्रसन्न होण्यासाठीं गणेशालाच वंदन करायला नको काय ? स्वर-व्यंजनयुक्त वर्णमालेला 'सिद्धम्' असें पुरातन नाव आहे. ॐ नमः सिद्धम् असेंही वर्णमाला शिकण्यापूर्वी म्हणत असत. या 'ॐ नमः सिद्धम्' चें जसें 'ओनामासिधं' झालें तसेंच पुढें गफलतीनें 'सिद्धम्' म्हणजे गणेशाची पत्नी 'सिद्धि' असें लोक समजूं लागले असावेत आणि त्यामुळें गणेश विद्यादाता ठरला असें काहीं विद्वानाना वाटतें. देवगुरु बृहस्पति म्हणजेच ब्रह्मणस्पति हा विद्येचा आणि बुद्धीचा देव. ब्रह्मणस्पति म्हणजेच गणपति अशी समजूत झाल्यामुळें गणपति ही विद्येची देवता झाली असें आणखी काहीं विद्वानाना वाटतें.

ॐकारांतील अ म्हणजे ब्रह्मा, उ म्हणजे विष्णु आणि म म्हणजे महेश. अशा तऱ्हेनें ॐकारात त्रिमूर्तीचा समावेश झाला. शिवाय ॐकारात गणेशाच्या भालावरील चंद्र आहे आणि गजाननाची सोंडहि आहे. म्हणूनच 'ॐ नमस्ते गणपतये' असें म्हणता आलें. पुराणानीं 'श्रीगणेशाय नमः' म्हटलें; पण वेदानीं तसें म्हटल्लें नाहीं. म्हणून वेदाना गणेशाचें विस्मरण झालें, किंवा त्याना गणपति ठाऊक नव्हता असें कसें म्हणता येईल ? 'ॐ गणानां त्वा गणपतीम् हवामहे कविं कवीनाम् उपमः श्रवस्तम्' असें त्यानीं म्हटलें आहे. पण त्या पूर्वीहि ते 'ॐ' किंवा 'हरि ॐ' असें म्हणतात. हा ॐ म्हणजे गणपतिच आहे. ॐ काराच्या रूपानें शब्दब्रह्म साकार झालें. 'ॐ नमो जी

आत्रा । वेद प्रतिपाद्या' असें ज्ञानदेवानीं म्हटलें. 'अ कार चरण युगुल । उ कार उदर विशाल । म कार महा मडल मस्तकाकारें ॥' असें त्यानीं या शब्दब्रह्माचें, आदिबीजाचें वर्णन केलें आहे. पण ॐकार हें गणपतीचें स्वरूप आहे हें या पूर्वीपासूनच मान्य झालें होतें

पण नुसत्या ॐकारावर गणपति-स्मरण न भागवता 'श्रीगणेशाय नम.' असे विस्तारानें म्हणण्यास केंव्हापासून सुरवात झाली हें कळणें कठीण आहे. कोणत्या ना कोणत्या स्वरूपात सुरवातीला विघ्नहर्त्याचें मगल स्मरण होतच होतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण आपल्या कार्यात विघ्न कोणालाच नको असतें. आणि वंदनानें किंवा स्मरणानेंहि जर मगल होत असेल तर तें कोण विसरेल? प्रारंभीच गणपतीचें स्मरण करण्याचें कारण तो गण-पति आहे. गणराज्यात गणाच्या पतीला पहिला मान असणारच जो ज्येष्ठराज आहे, कवींचा कवि आहे, त्याला कोणत्याहि समारभात मानाचें पहिलें पान दिलें पाहिजे हें उघडच आहे. कारण गणपति हा विघ्नराज आहे यदन केल्यानतर तो विघ्नहर्ता होतो. विघ्नेशाचें विस्मरण म्हणजे विघ्नाना निमत्रणच मगल कार्यात विघ्न यावें असें कोणत्या कार्यकर्त्याला वाटेल? म्हणून 'आधीं मूळ धाडा । आवेयाच्या टाळा ॥ गौरियेच्या बाळा । गजानना ॥' असें गणपतीला प्रथम निमत्रण देतात

गजवदनमचिन्त्य तीक्ष्णदंष्ट्रं त्रिनेत्रम् ।
बृहदुदरमशेष भूतराज पुराणम् ।
अमरवर सुपूज्य रक्तवर्णम् सुरेशम् ।
पशुपति-सुतमिश विघ्नराज नमामि ।

असें विघ्नराजाचें मगलस्मरण केलें पाहिजे मगलाष्टकात पहिलें मगल या मंगलमूर्तीचेंच. मग मंगलाष्टक पुढें म्हणायचें. त्यात पहिल्या प्रथम घाणा भरला पाहिजे आणि त्यापूर्वी गणेशाचें स्मरण केलें पाहिजे.

घाणा भरियेला । विडा ठेवीला ॥
प्रथम नमीला ॥ गणराज ॥

विघ्नेश हा विघ्नहर्ता आहे. तो मगलमूर्ति आहे. 'सकळ मंगळ मंगळाधीशा' असें त्याचें स्तवन केलें जातें. सूर्योदयानें अधकाराचा नाश व्हावा तसा शिंदूरवदन देवाच्या पायाचें स्मरण केलें असतां विघ्नाचा नाश होतो. अशा विघ्नहराचें सतत दर्शन व्हावें म्हणून घराच्या पुढील दारावर

लिहिलें पाहिजे अशी अट व्यासानीं घातली. खुद्द गणेशालाहि क्षणभर डोकें खाजवावयाला लागेल असे कूट श्लोक त्यानीं मधून मधून तयार करायचे आणि गणपती त्याचा अर्थ लक्षात आणीपर्यंत आणखी अनेक श्लोक रचून ठेवायचे अशा तऱ्हेनें व्यासानीं महाभारत पुरें केलें व्यासानीं यावेळीं ८८०० गूढ अर्थाचे श्लोक रचले असें सौतीनच महाभारतात सांगितलें आहे. गायत्रीतत्र शंकरानीं सांगितलें आणि गणपतीनें लिहिलें, असें हें गजकौतुक आहे. ग्रंथारंभीं गणेशवंदनाची प्रथा व्यासानीं सुरू केली असें मात्र नव्हे कारण आजकाल असें लेखक ग्रंथारंभीं गणेशवंदन करतोच असें नाहीं त्याप्रमाणेंच कालिदासानेंहि तें पूर्वी केलेलें दिसत नाहीं.

श्रीगणेश विद्यादाता आहे असेंच मानतात तो विद्यादाता कसा झाला ? विद्वानानीं याबद्दल निरनिराळे तर्क केले आहेत गणेश हा सिद्धि आणि बुद्धि याचा पति आहे. मग सिद्धि आणि बुद्धि प्रसन्न होण्यासाठीं गणेशालाच वंदन करायला नको काय ? स्वर-व्यंजनयुक्त वर्णमालेचे 'सिद्धम्' असें पुरातन नाव आहे. ॐ नम: सिद्धम् असेंही वर्णमाला शिकण्यापूर्वी म्हणत असत. या 'ॐ नमः सिद्धम्' चें जसें 'ओनामासिध' झालें तसेंच पुढें गफलतीनें 'सिद्धम्' म्हणजे गणेशाची पत्नी 'सिद्धि' असें लोक समजूं लागले असावेत आणि त्यामुळें गणेश विद्यादाता ठरला असें काहीं विद्वानांना वाटतें देवगुरु बृहस्पति म्हणजेच ब्रह्मणस्पति हा विद्येचा आणि बुद्धीचा देव. ब्रह्मणस्पति म्हणजेच गणपति अशी समजूत झाल्यामुळें गणपति ही विद्येची देवता झाली असें आणखी काहीं विद्वानांना वाटतें.

ॐकारातील अ म्हणजे ब्रह्मा, उ म्हणजे विष्णु आणि म म्हणजे महेश. अशा तऱ्हेनें ॐकारात त्रिमूर्तीचा समावेश झाला. शिवाय ॐकारांत गणेशाच्या भाळावरील चंद्र आहे आणि गजाननाची सोंडहि आहे म्हणूनच 'ॐ नमस्ते गणपतये' असें म्हणता आलें पुराणांनीं 'श्रीगणेशाय नमः' म्हटलें, पण वेदानीं तसें म्हटलेलें नाहीं म्हणून वेदांना गणेशाचें विस्मरण झालें, किंवा त्यांना गणपति ठाऊक नव्हता असें कसें म्हणतां येईल ? 'ॐ गणानां त्वा गणपतिं हवामहे कविं कवीनाम् उपमः श्रवस्तम्' असें त्यानीं म्हटलें आहे. मग त्या पूर्वीहि ते 'ॐ' किंवा 'हरि ॐ' असें म्हणत. हा ॐ म्हणजे गणेशबीज आहे. ॐकाराच्या रूपानें शब्दब्रह्म साकार झालें. 'ॐ नमो जी

'गणपति तुझी सोंड वाकडी।
शारदे तुझी नथ पाकडी॥
उंदिरा तुझी शेपटी अडकली।
मांजरा तुझी पोळी पिकली॥'

असें काव्य त्यांना स्फुरूं लागतें. 'आपुडं माझ्या मज चालवेना। विशाल दोंद मज हालवेना' इतकी लठ्ठ तीं मुलेंच गणपतीबरोबर करू शकतात. हस्तनक्षत्र लागलें म्हणजे ल्हान मुली हदग्याची गाणीं म्हणून खेळतात. त्यावेळीं त्या काय म्हणतात? 'ऐलम्मा पैलम्मा गणेशदेवा। माझा खेळ मांडूं दे करीन तुझी सेवा।' असें हें मुलांचें गणेश-प्रेम आहे.

'विप्राणां दैवतं शंभू। क्षत्रियाणां तु माधवः। वैश्यानां तु भवेत ब्रह्मा। शूद्राणां गणनायकः' असें कधीं असेल तें असो. शूद्रांचीं दैवतें असलेले हे गणनायक अनेक असतील पण मंगलमूर्ति गणनायक सर्वांचीच आवडती देवता आहे. ती आबालवृद्धांना प्रिय आहे ती अनेक तन्हांनीं आणि अनेक स्वरूपांत भारतीयांच्या जीवनांत भरून राहिली आहे तिच्यासंबंधीं देहवाद्यापासून आत्मवाद्यापर्यंत, नास्तिकापासून आस्तिकापर्यंत सर्वांनीं अनेक कल्पना करून आत्मसमाधान करून घेतलें आहे अशी ही मंगलमूर्ति उत्साहाची मूर्ति आहे. तिच्या आगमनाबरोबर सर्वांचें मन आनंदानें नाचू लागतें. आणि म्हणूनच त्याला पोंचवतांना 'मंगलमूर्ति मोरया। पुढच्या वर्षी लवकर या' असें त्याला ल्हानापासून थोरापर्यंत सगळे जण मोठमोठ्यानें सांगत असतात पुढच्या वर्षी पुन्हा येण्याला त्याला उशीर होऊं नये म्हणून घरातून बाहेर पडतांना गणेशमूर्तीचें तोंड तीनदां घराकडे वळवतात, त्याच्या हातावर दहीं घालतात. 'पुढच्या वर्षी लवकर या' असें म्हणतांना सगळ्यांचा कंठ भरून आलेला असतो.

वेदोपनिषदांतून, इतिहासपुराणांतून हा गणेश कसकसा प्रगट होत आला, हिंदुधर्मांतच नव्हे तर जैन-बौद्ध धर्मांतहि तो कसा स्थिर झाला, भारताबाहेर त्यानें कशी यात्रा केली हेंच आतां पहावयाचें आहे. त्याचें श्रेष्ठ आध्यात्मिक स्वरूप तर दिसेलच; पण त्याच्या दर्शनाबरोबर भारताचा सहस्रावधी वर्षांचा इतिहासहि साकार होईल. पौर्वात्य पंडितांनीं आणि पाश्चात्य विद्वानांनीं गणेशाचा जो शोध घेतला तो पाहिल्यानंतर भारतीय संस्कृतीचें सामर्थ्यहि कळेल.

# गजाननाचा जन्म

प्रथम गणेशाचें नाम-रूप समजून घेतलें पाहिजे. कारण या नामरूपानेंहि गजानन ही वैशिष्ट्यपूर्ण अशी देवता आहे. 'सर्वेषु गात्रेषु शिरः प्रधानम्' आणि गणेशाचें शिर हें सर्वांत वैशिष्ट्यपूर्ण आणि आकर्षकहि आहे. गजवदन गणेशाचा जन्म कसा झाला किंवा गणेशाला गजवदन कसें प्राप्त झालें यासंबद्दल पुराणात निरनिराळ्या कथा सापडतात. पुराणकारांनीं आणि गणेशभक्तांनीं गजाननाचा जन्म भिन्न भिन्न रीतीनें पाहिला असे आपण समजूं. या निरनिराळ्या कथा वेगवेगळ्या कल्पातील आहेत म्हणून त्यात भेद दिसतो असेंहि या कथा-भेदाचें समर्थन श्रद्धावान सांप्रदायिक करतात.

गजानन-जन्माची एक कथा प्रसिद्धच आहे पार्वती एकदा आपल्या स्नानगृहात विवस्त्र होऊन स्नान करीत होती इतक्यात शंकर तिथें एकदम आले. शंकराना पहाताच पार्वती अतिशय लाजली. पुन्हा असा प्रकार होऊं नये म्हणून काय करावें यासंबद्दल ती विचार करूं लागली. तेव्हा तिच्या सख्यांनीं सांगितलें कीं, 'फक्त तुझीच आज्ञा पाळील असा द्वारपाल तू स्नानगृहावर ठेव' पार्वतीला हा सल्ला मानवला. मग पार्वतीनें आपल्या अंगाला लावलेल्या उटण्याचा एक पुतळा तयार केला. त्याला सजीव केलें आणि द्वारपाल म्हणून त्याची नेमणूक केली या नव्या द्वारपालानें एकदा शंकराला आत जाण्यास प्रतिबंध केला. शंकरानें त्याचीं अनेक आर्जवें केलीं तरीहि तो ऐकेना. शेवटीं शिवगणांनीं, देवांनीं, खुद्द शंकरानीं त्याच्याशीं युद्ध केलें. पण तो त्याना दाद देईना. अखेर विष्णु आणि शंकर क्रुद्ध झाले व त्यांनीं या द्वारपालाचा शिरच्छेद केला.

आपल्या द्वारपालाचा शिरच्छेद झाला हें ऐकून पार्वती रागावली. ती सर्व त्रैलोक्य भस्म करण्यास निघाली. तेव्हा नारदांनीं मध्यस्थी करून असें ठरविलें कीं, त्या पुरुषाला पुन्हा जिवंत करावें. पण त्याचें कापलेलें डोकें कुठ सापडेना. तेव्हा शंकरानीं आपल्या गणास सांगितलें कीं, जो प्राणी तुम्हाला प्रथम दिसेल त्याचें डोकें कापून आणा. याचवेळीं गजासुर नांवाचा राक्षस देवाना त्रास देण्यासाठीं येत होता त्याला पहाताच शंकरानें त्याचें मस्तक कापले आणि तें या द्वारपालाच्या धडावर ठेऊन त्याला जिवंत केलें या गजवदनाला पार्वतीनें आपला पुत्र मानलें आणि शंकरानें त्याला आपल्या गणाचे आधिपत्य दिलें

दुसऱ्या कथेत गजानन हा पार्वतीचा पुत्रच आहे मानलेला नव्हे, अगदी खरा "मी तुझा पुत्र होईन" असा वर गणेशानें पूर्वी पार्वतीस दिला होता सिंदुरासुरानें कहर मांडला आणि खुद्द शंकर पार्वतीला उपद्रव देण्यास सुरवात केली, तेव्हा गणपतीनें पार्वतीच्या उदरात जन्म घेतला सिंदुरासुराला हें वर्तमान समजताच त्यानें पार्वतीच्या उदरात शिरून गर्भाचें मस्तक छेदलें आणि तें नर्मदेंत टाकून दिलें यामुळें नर्मदेचें पाणी व तिच्यातील दगड लाल झाले हेच 'नर्मदे' गणपति होत नवमास भरताच पार्वती प्रसूत झाली पण पुत्राला मस्तक नाहीं असें पहाताच मोठा आकांत झाला तेव्हा विष्णूनें इंद्राचा ऐरावत उन्मत्त झाला होता त्याचें मस्तक कापून आणलें आणि या मुलाच्या धडाला चिकटविलें अशा तऱ्हेनें पार्वतीचा पुत्र गजानन झाला

दुर्मती राक्षसाचा वध करण्यासाठीं गणेशानें पार्वतीपुत्र गजाननाचा अवतार घेतला शिवपार्वतींनीं वैनायकस्नान करून गणेशाची एक मातीची मूर्ति केली तिची पूजा करताच ती मूर्ति जिवंत झाली हा गणपती पुढें वयांत आल्यावर त्याला विष्णूनें आपली पुष्टि नावाची कन्या दिली या विवाह प्रसंगीं सर्व देव आले होते शनीहि आला होता पण त्यानें आपले डोळे मिटून घेतले होते पार्वतीनें त्याला डोळे उघडण्याचा आग्रह केला पण आपली दृष्टि पडली तर कांहींतरी विपरीत होईल अशी भीति त्यानें व्यक्त केली तरीहि पार्वती आपला आग्रह सोडीना ती म्हणाली 'इथें सर्व मंगल आहे' अखेर शनीनें डोळे उघडून पाहिलें त्याबरोबर एका क्षणात गणेशाचें शिर दिसेनासें झालें मोठी गडबड उडाली इतक्यात तें शिर पुन्हा होतें तसें दिसू लागलें

हीच कथा आणखी दोन प्रकारें दिलेली आहे आपल्याला पुत्र व्हावा असा पार्वतीनें एकदा हट्ट धरला ती म्हणाली कीं निघून कैलास सोडून गेलेल्या माझ्या कार्तिकेयाला तरी घेऊन या शंकर कार्तिकेयाला आणण्यासाठीं गेले आणि इकडे पार्वतीनें एक मातीची बाहुली करून तिच्याशीं खेळण्यास सुरवात केली जगदंबेला संतुष्ट करण्याची ही चांगली संधि आहे असें म्हणून विष्णूनीं त्या मातीच्या पुतळ्यात प्रवेश केला पुतळा जिवंत झाला आणि विष्णु पार्वतीचा पुत्र झाला कार्तिकेयाला घेऊन शंकर परत आले तेव्हा त्यांना ही सर्व हकीकत समजली त्यांना मोठा आनंद झाला पार्वतीच्या या पुत्राला पहाण्यासाठीं सगळे देव आले शनीहि आला पण तो डोळे उघडीना मोठ्या आग्रहानें शनीनें डोळे

उघडताच पुत्राचें शिर उडून गेलें मोठा कोलाहल झाला. शिर शोधण्यासाठीं शंकरानें आपल्या गणाना पाठवलें, पण तें सापडेना. शेवटीं, दक्षिणेकडे पाय करून जो प्राणी झोंपला असेल त्याचें डोकें कापून आणा अशी शंकरानें आपल्या गणाना आज्ञा केली. एक हत्तीण दक्षिणेकडे पाय करून झोंपली होती तिचें शिर कापून घेऊन गण आले तें शिर मुलाला लावण्यात आलें.

ब्रह्मवैवर्त पुराणात हीच कथा थोडी वेगळी आहे शिव-पार्वतीला श्रीकृष्णव्रत केल्यानतर पुत्रप्राप्ती झाली. शनीची दृष्टि पडून या पुत्राचें शिर उडाल्यानंतर विष्णूनें पुष्पभद्रा नदीच्या तीरीं दक्षिणेकडे पाय करून झोंपलेल्या हत्तीचें शिर कापून आणून तें या मुलाला लावलें.

सुप्रभेदागमामध्यें असलेली गजवदनाची कथा याहून विलक्षण आहे सोमेश्वर लिंगाचा महिमा असा होता कीं, त्याचें अर्चन करून मोठमोठे पातकी देखील स्वर्गांत जाऊ लागले. यामुळें देवाना चिंता पडली देवानीं शंकराकडे तक्रार नेली. पण ते म्हणाले, याबाबत मी कांहीं करू शकत नाहीं तुम्ही पार्वतीला सागा. देवानीं पार्वतीकडे गाऱ्हाणें नेलें तेव्हा तिला दया आली. तिनें विघ्नेश्वर सृष्टि निर्माण करण्याचा निश्चय केला आपल्या अगाला उटणीं चोळून त्या उटण्याचें तिनें पुन्हा गोळे तयार केले आणि ती गंगासागरावर गेली. तेथें मालिनी नावाची एक गजमुखी राक्षसी राहत होती तिनें हे उटण्याचे गोळे खाल्ले त्यामुळें तिला गर्भ राहिला. कांहीं दिवसानीं त्या मालिनीला पाच सोंडांचा मुलगा झाला शंकरानें त्याला आपला पुत्र मानलें आणि त्याच्या पाच सोंडा एकत्र करून त्याची एक सोंड बनवली आणि त्याला विघ्नें करण्याचें काम दिलें

लिंगपुराणात स्वतः शिव हेच विघ्नेश्वर झाले अशी कथा आहे. तपश्चर्या आणि यज्ञ करून असुर शंकराकडून वर मिळविनात याचा देवाना खेद वाटत होता. म्हणून देवानीं शंकराची प्रार्थना केली तेव्हा शंकरानें एका अंशानें पार्वतीच्या शरीरात प्रवेश केला आणि मग गणेशाचा जन्म झाला. याला विघ्नेश्वर हें नाव शंकरानीं ठेवलें जन्म पावताच या विघ्नेश्वरानें शंकराला नमन करून नृत्य करण्यास प्रारंभ केला. त्यामुळें शंकर प्रसन्न झाले आणि त्यानीं त्याला विघ्नकर्त्याचें कार्य दिलें

वराहपुराणात ही कथा आणखीच वेगळी आहे देवाची प्रार्थना ऐकून शंकर क्षुब्ध झाले ते ध्यान करू लागले तेव्हां त्याच्या मस्तकापासून तेजाची ज्योत

निघाली, आणि तेथें शिवासारखाच सुंदर पुत्र निर्माण झाला. आपल्याशिवाय एकट्या शंकरानेंच हा अतिशय सुंदर पुत्र निर्माण केला हें पाहून पार्वतीस राग आला आणि तिनें त्या पुत्राला शाप दिला कीं, तू गजमुख होशील आणि तुझें बाकीचें शरीरहि बेढब दिसेल हा शाप शंकरानें मान्य केला, पण त्या पुत्राला वरहि दिला कीं, तुला गणेश, विनायक, विघ्नराज, शिवसुत असें म्हणतील. *सिद्ध आणि यश हीं तुझ्यापासूनच निर्माण होतील अत्यसस्कार वगळून* सर्व कार्यारंभीं तुझे पूजन स्मरण केलें जाईल जे असें करणार नाहींत त्यांचें कार्य आणि मन फुकट जाईल

गणेश गजमुख कसा झाला याबद्दल आणखीहि एक कथा आहे विशेष म्हणजे ही कथा शंकरानें खुद्द गजाननालाच सांगितली आहे! शंकर म्हणतात – 'एकदा मी आणि पार्वती हिमालय पर्वतात विहार करीत होतो तेथें एक हत्ती हत्तिणीबरोबर क्रीडा करीत होता *आपणहि तशीच क्रिडा करावी असें वाटून* मी हत्तीचें आणि पार्वतीनें हत्तिणीचें रूप घेतलें आणि मग आम्ही क्रीडा केली त्यामुळें तुझा जन्म झाला आणि तुला गज-वदन प्राप्त झालें '

मत्स्यपुराणातील कथा आणखीच निराळी आहे एकदा पार्वतीनें आपल्या अंगाच्या मळीनें एक मूर्ति तयार केली त्याला हत्तीचें मुख होतें, बाकीचा देह पुरुषासारखा होता त्या मूर्तीशीं खेळता खेळता पार्वतीनें ती गंगेंत टाकली ताबडतोब त्या मूर्तीनें विशाल देह धारण केला गंगेचा पुत्र म्हणून देवांनीं त्या गजाननाची पूजा केली ब्रह्मदेवानें त्याला विनायक गणाचें आधिपत्य दिलें

स्कंद पुराणातील एक कथा, गणेशाला हत्तीच मस्तक स्कंदामुळ प्राप्त झालें असें सांगते त्याचें असें झालें कीं, पार्वती उटणें घेऊन मूर्ती बनवीत असता मूर्तीचें मस्तक तयार करण्यापूर्वीच उटणें संपलें तेव्हा तिनें कार्तिकेयाला आणखी उटणें आणायला सांगितलें पण त्या खोडकर मुलानें उटणं न आणता हत्तीचें शिर आणलें आणि पार्वती नको नको म्हणत असता तें त्या मूर्तीवर बसविलें! अशा रीतीनें गजानन साकार झाला मग शंकरानें तुझें स्मरण सर्वप्रथम होईल असा त्याला आशीर्वाद दिला. कार्तिकेयानें आपला परशु त्याच्या हातात दिला पार्वतीनें त्याला मोदक दिले मोदकाच्या वासानें तेथें उंदीर आला आणि मोदक खाऊन तो अमर झाला. मग गणपतीनें त्याला आपलें वाहन बनविलें

श्रीगणेशाच्या गजवदना इतकाच त्याच्या भालावरील चंद्र आणि त्याचे मूषक वाहन लक्ष वेधून घेणारे आहे तेव्हा त्यासंबंधींच्या पुराणातील विविध कथाहि पाहिल्या पाहिजेत गणेशचतुर्थीला चंद्राचे मुखावलोकन करू नये असे म्हणतात कारण गणपतीनेंच त्याला तसा शाप दिला आहे त्या दिवशीं जो चंद्रदर्शन करील त्याच्यावर मोठा आळ येतो अशी समजूत आहे श्रीकृष्णानें गणेशचतुर्थीला चंद्रदर्शन केलें आणि त्यामुळें स्यमंतकमणी चोरल्याचा त्याच्यावर आळ आला ही कथा प्रसिद्ध आहे गणपतीच्या शापानें गणेशचतुर्थीच्या दिवशीं चंद्रदर्शन घेणे हा दोष ठरला, पण त्या चंद्राला पुढें गणपतीनेंच वर दिला आणि आपल्या मस्तकींहि धारण केलें त्यामुळ गजाननाला भालचंद्र असें नाव मिळालें चंद्राला गणपतीनें दिलेल्या या शापाबद्दल आणि वरदानाबद्दल पुराणात विविध कथा आहेत

गणेशपुराणात अशी कथा आहे की एकदा नारद कैलासावर शिवदर्शनासाठीं गेले होते नारदानीं एक अपूर्व फल शंकराला अर्पण केलें तेथें कार्तिकेय आणि गजानन दोघेहि असले होते ते त्या फळासाठीं आपसात भांडू लागले तेव्हा फळ कोणाला द्यावें असा शंकराला विचार पडला फळ कोणाला द्यावें असें त्यानीं ब्रह्मदेवाला विचारलें ब्रह्मदेवानें त फळ कार्तिकेयाला द्यावें असें सांगितलें यामुळ गणपति रागावला पुढें ब्रह्मदेव जेव्हा सृष्टिरचनेचें नित्यकर्म करावयाला बसले तेव्हा गणपतीनें उग्र रूप धारण करून त्याला भिवविण्यास सुरवात केली ब्रह्मदेव भ्याले

ही सगळी गमत चंद्र पहात होता त्याला मौज वाटली गणपतीच्या त्या अद्भुत आणि उग्र रूपाचीहि त्यान चेष्टा केली आणि तो मोठमोठ्यान हसू लागला तेव्हा गणपतीनें त्याला शाप दिला कीं, यापुढें जो कोणी तुझें दर्शन घेईल त्याला पातक लागेल हा शाप ऐकून चंद्र दीन आणि मलीन झाला त्यानें आपले काळ तोंड लपविलें त्यामुळ पृथ्वीवरची शीतलता नष्ट झाली देवांनाही खेद झाला चंद्राला पश्चात्ताप झालाच होता त्याच्यासाठीं देवानीं गजाननाची प्रार्थना केली तेव्हा गणेशानीं कृपाळू होऊन सांगितलें कीं माझा शाप फक्त गणेशचतुर्थीपुरताच मी कायम ठेवतो पुढ चंद्रानें तपश्चर्या करून गजाननाला

प्रसन्न करून घेतलं मग गणेशानें त्याला असा वर दिला कीं, 'तुला पूर्वीचें सौंदर्य पुन्हा प्राप्त होईल वद्य चतुर्थीला तुझें दर्शन घेतल्यावेरीज माझी पूजा पूर्ण होणार नाहीं शुद्ध द्वितीयेला तुझें दर्शन लोक पुण्यकारक समजतील ' याच वेळीं चंद्राची एक कला गजाननानें आपल्या मस्तकीं धारण केली तेंव्हापासून त्याला भालचंद्र म्हणू लागले

गणेश भालचंद्र कसा झाला याबद्दल गणेशपुराणातच दुसरीहि एक कथा आहे यमाच्या नगरात मोठा उत्सव चालू होता त्यावेळीं तिलोत्तमा नृत्य करीत असता तिच्या सौंदर्यावर यम मोहीत झाला आणि त्यामुळें अनलासुर नावाचा भयंकर राक्षस निर्माण झाला तेंव्हा घाबरलेल्या देवानीं गणेशाची प्रार्थना केली गणेश बालरूपानें प्रगट झाले आणि त्यानीं अनलासुराचा वध करण्याचें आश्वासन दिलें इतक्यात अनलासुर दशदिशा भस्म करीत तेथे आला बाल गजाननान त्याला गिळून टाकलें प्रत्यक्ष अग्निरूप असुराला गिळल्यामुळें गजाननाच्या अंगाचा दाह होऊ लागला

तेंव्हा देवानीं त्याला शीतलोपचार अर्पण केले इंद्रानें शीतल आणि अमृतमय चंद्र त्याच्या मस्तकावर ठेवला ब्रह्मदेवानें सिद्धि आणि बुद्धि या मानसकन्या त्याला अर्पण केल्या विष्णूनें आपल्या हातातील थंडगार कमल त्याला दिलें वरुणानें थंडगार जलाचा अभिषेक केला शंकरानें सहस्र मुखाचा शेष त्याच्या पोटाभोंवतीं बांधला तरीहि दाह शांत होइना तेंव्हा अठ्यायशीं सहस्र मुनींनीं प्रत्येकीं एकवीस अशा हिरव्यागार दूर्वा गजाननाच्या मस्तकावर घातल्या तेंव्हा तो दाह शांत झाला चंद्रामुळें 'भालचंद्र,' कमळामुळें 'पद्मपाणि,' शेषामुळें 'व्यालबद्धोदर' अनलाचा प्रशम केल्यामुळे 'कालानल प्रशमन' अशीं नावें गणेशाला मिळालीं

मुद्गल पुराणातील कथा थोडी वेगळी आहे देव आणि मुनी यानीं गणपतीच पूजन करण्याच कारण नाहीं असें एकदा ठरविलें आणि ते देव-पंचकाची भक्ति करू लागले तेंव्हा त्याच अज्ञान नाहींसें करण्यासाठीं गणेशानें अक्राळविक्राळ रूप धारण केलें तें पाहून देव व मुनी मूर्च्छित झाले सावध झाल्यावर त्यानीं गणेशाचें भक्तिपूर्वक स्तवन केलें तेंव्हा गजाननानें सौम्यरूप धारण केलें मग देवानीं गणेशाची पूजा केली ब्रह्मदेवान सरस्वती, विष्णूनें पुष्टि, शंकरानें योगिनी, जगदंबेनें मोहिनी, सूर्यानें संजीवनी अशा

आपापल्या मानसकन्या गणेशाला अर्पण केल्या तेव्हा गणपतीनीं देवांना सांगितलें कीं, तुम्ही माझे केवळ अंश आहात म्हणून गर्व करूं नका

देवानीं गजाननाची क्षमा मागितली पण शंकराच्या भालप्रदेशीं असलेला चंद्र गणपतीची विद्रूप मूर्ति पाहून उन्मत्तपणें हसला आणि 'हे हत्तीचें तोंड का धारण केलें ?' असें उपहासानें विचारूं लागला प्रथम गणपतीनें त्याच्याकडे दुर्लक्ष केलें पण चंद्र पुन्हा पुन्हा तोच प्रश्न विचारूं लागला तेव्हा गणेशानें त्याला शाप दिला पुढें चंद्राने पश्चात्तापपूर्वक तपश्चर्या केल्यानंतर त्याला वर दिले तिरस्कारपूर्वक कोणाचाहि उपहास केला तरी त्याचें प्रायश्चित्त मिळतेंच असेंहि गणपतीनें त्याला सांगितलें

आणखी एक कथा अशी आहे कीं गजाननाची स्वारी एकदा उंदरावर बसून चालली होती इतक्यात त्याच्यासमोरून एक साप गेला सापाला पहाताच उंदीर भीतीनें कापूं लागला आणि मध्येंच अडखळला त्यामुळ गणेशानीं त्या सर्पाला ठार मारलें आणि आपल्या कमरेला गुंडाळलें आपल्या सत्तावीस बायकासह चंद्र हें सगळें पहात होता तो उपहासानें मोठमोठ्यानें हसूं लागला त्यामुळ गणेशाला अत्यंत क्रोध आला आणि त्यानें आपला एक सुळा उपटला आणि तो चंद्रावर फेंकला त्यामुळें चंद्र काळाठिक्कर पडला पुढें चंद्रानें आणि देवानीं प्रार्थना केल्यावर गणेशानं त्याचें सौंदर्य त्याला पुन्हा प्राप्त होईल, पण दर महिन्याला, पधरा दिवस त्याची एक एक कला नष्ट होईल आणि पधरा दिवस त्याला एक एक कला प्राप्त होईल असा वर दिला

श्रीगणेशाचीं जीं असख्य नावें आहत त्यात मूषकवाहन मूषकध्वज, आखुरथ अशींहि अनेक नावें आहेत गजाननाचें वाहन उंदीर आहे हाच त्याचा अर्थ आहे गणपतीला मोदकाचा नैवेद्य दाखविल्यावर उंदरालाहि करजी द्यावी लागते गणपतीच्या पायाकडे उंदीर असतोच गणराजासारख्या विशाल देहाच्या आणि भव्य देवतेला उंदरासारखें अगदींच छोटें वाहन असावें याचें आश्चर्य वाटल्याशिवाय रहात नाहीं उंदराची मूर्ति छोटी असली तरी त्याची कीर्ति फार मोठी आहे उंदराचा चोरटेपणा आणि त्याचा उपद्री स्वभाव पाहिल्यानंतर गजाननानें त्याला आपल्या पायाखालीं ठेवलें आहे याबद्दल समाधानच वाटतें

गजाननाला हें मूषकाचें वाहन कसें प्राप्त झालें याबद्दल पुराणात निरनिराळ्या

कथा आहेत गणेशपुराणात एक कथा अशी आहे की, इंद्रसभेत एकदा क्रौंच नावाच्या गधर्वाची लाथ चुकून वामदेव नावाच्या महर्षीला बसली. वामदेव रागावले आणि 'तू भयंकर मूषक होशील' असा त्यांनी त्या गधर्वाला शाप दिला पुढं तो गधर्व उंदीर होऊन पराशर ऋषीच्या आश्रमाजवळ पडला या उंदराने आश्रमातले पदार्थ खाऊन खाऊन पराशर ऋषीना अगदी सतावून सोडले शेवटी पराशर ऋषींनी गणेशाची प्रार्थना केली गजानन प्रगट होऊन त्याने त्या उंदरावर आपला पाश टाकला तेव्हा तो उंदीर शरण आला म्हणून गणपतीने प्रसन्न होऊन 'वर माग' असं त्याला सांगितले पण त्या उंदराने पुन्हा गर्विष्ठपणाने असे म्हटले, तुझ्याकडून मला कसलाहि वर नको, तूच माझ्याकडे वर माग ' त्याचा हा उद्दामपणा पाहून 'तू आजपासून माझे वाहन हो,' असें त्याला गणेशाने म्हटले आणि लगेच तो त्या उंदराच्या पाठीवर बसला मग मात्र गजाननाच्या भाराने तो अतिशय दीन झाला

हा क्रौंच गधर्व उंदीर होण्याच दुसरे एक कारण गणेशपुराणातच दिलें आहे ते असें की, सौभरी नावाच्या ऋषीची मनोमयी नावाची एक सुंदर आणि पतिव्रता पत्नी होती तिच्याशी या गधर्वाने एकदा लगट करण्याचा प्रयत्न केला इतक्यात सौभरी ऋषी तेथें आले आणि त्यांनी त्याला 'तू उंदीर होऊन चोरून मारून उपजीविका करशील' असा शाप दिला हाच उंदीर पुढे वर सांगितल्याप्रमाणे पराशराच्या आश्रमात आला

मुद्गल पुराणात उंदराच्या जन्माची कथा अगदींच वेगळी आहे ब्रह्मदेवाच्या मोहापासून निर्माण झालेला मायाकर असुर सर्व जगाला पीडा देत होता त्यावेळी शेषाच्या हृदयातून लंबोदराने अवतार घेतला मयाकराच्या त्रासापासून मुक्त कर अशी देवांनी गणेशाची प्रार्थना केली तेव्हा आपण शेषाच्या घरी लंबोदराचा अवतार घेतला आहे असें सांगून गणेश त्यांना म्हणाले की तुमच्यामधें जे मुख्य चार देव आहेत त्यांनी आपल्या अंशांनी माझें वाहन सिद्ध करावें त्याप्रमाणें कोणाचें देवांनी ठरविलें शंकर म्हणाले की, लंबोदराचें वेदांनी सांगितलेलें वाहन मूषक हें आहे त्याप्रमाणें परमेश्वर जीवाच्या अन्तःकरणात राहून जीवाच्या नकळत सर्व भोग चोरून आपणच भोगतो, व नकळत सर्व कर्मे करवितो, त्याप्रमाणे सर्व भोग भोगणारा व सर्व कर्म करविणारा हा लंबोदराचा मूषक आहे

मग शंकराच्या सूचनेप्रमाणे शंकर प्रमुख चार देवांनी आपल्या अंशाने मूषक तयार केला आणि ते देवाच्या घरी लंबोदराकडे गेले. लंबोदराने ते वाहन स्वीकारले आणि मायाकराचा नाश केला. मुद्गल पुराणांतील या कथेत गणेश-वाहन उंदीर हा चार देवांचा अंश आहे असे सांगितले आहे.

गणेश हा मूषकवाहन आहे तसाच एकदंत आहे. एकदंत हे त्याचे नावच आहे. गणेशाचा एक दंत मोडलेला आहे इतकेच नव्हे तर मोडलेला दांत त्याने आपल्या हातांत घेऊन ठेवलेला आहे. हा मोडलेला दांत हातांत घेऊन गणेशाने फार मोठमोठी कामे केलेली आहेत. ते त्याचे शस्त्रच बनलेले आहे. गणेश ज्यावेळी व्यास महर्षींवर प्रसन्न होऊन त्याचा लेखक बनला त्यावेळी त्याने या दांताची लेखणी केली. हा दांत शस्त्राप्रमाणे गणेशाने वापरला याच्या काही कथा मागे आल्याच आहेत.

गजाननाला प्रथम दोन दांत होते आणि पुढे तो एकदंत झाला असे सांगणाऱ्या खूप कथा आहेत. पण त्याला गज-वदनाबरोबरच एकदंत मिळाला असेहि एका कथेत म्हटले आहे. विष्णूने हत्तीचे शिर कापून आणून ते शिर-विरहित झालेल्या पार्वतीपुत्राच्या धडावर बसविले. विष्णूने ज्या हत्तीचे शिर कापून आणले त्याला एकच दात होता असे कथेत म्हटले आहे. पण ही एक कथा वगळली तर गणेशाला गजवदन मिळाले त्यावेळी दोन दांत होते असेच सर्वत्र म्हटलेले आहे. मग गणेश एकदंत कसा झाला ? शंकराने‌च क्रोधाने एकदा त्याचा दांत मोडला असे एका कथेत म्हटले आहे, तर दुसऱ्या कथेत हा दांत परशुरामाने आपल्या परशूने तोडला असे म्हटले आहे. सहस्रार्जुनाच्या वधानंतर परशुराम एकदा कैलासाला गेले. पण शिव-पार्वतीचे दर्शन करण्यासाठी गणेश त्यांना आंत सोडीना. म्हणून परशुरामाने त्याच्याशी युद्ध केले आणि त्या युद्धात गणेशाचा दांत मोडला. ही कथा परशुरामाच्या कोपिष्ट स्वभावाला धरून असली तरी परशुरामाच्या दुसऱ्या एका कथेशी विसंगत आहे. कार्तवीर्याने जमदग्नीला ठार मारले आणि रेणुकेला घायाळ केले हे कळल्यानंतर परशुरामाने निःक्षत्रिय पृथ्वी करण्याची प्रतिज्ञा केली आणि तो गणेशाला प्रसन्न करून घेण्यासाठी तपश्चर्येला गेला. गणेशाने प्रसन्न होऊन परशुरामाला आपल्या हातातील परशु दिला असे त्या दुसऱ्या कथेत म्हटले आहे.

गजाननानें स्वत च क्रोधानें आपला एक दांत मोडला आणि आपल्याकडे उपहासानें पहात हसणाऱ्या चंद्रावर मारला ही कथा मागें दिलीच आहे. पण गणेशानें स्वतःच दात मोडला या कथेपेक्षा असुराशीं युद्ध करीत असताना तो मोडला असे सांगणाऱ्या कथा अधिक आहेत. गजमुखासुराशीं गणेश ज्यावेळीं युद्ध करू लागला त्यावेळीं त्या दैत्यानें गणेशाचा एक दात मोडला तो मोडलेला दात हातात घेऊन गणेशानें गजमुखासुरावर प्रहार केला त्यावेळीं तो असुर घाबरला आणि त्यानें उंदराचे रूप घेतलें गणपतीने लगेच त्या उंदराला आपलें वाहन केलें अशी एकदंताची आणि मूषक-वाहनाची एक कथा आहे. गणेशपुराणात दिलेली दुसरी कथा अशी : विनायक अवतारात देवातक असुराला मारण्यासाठीं गणेशानें प्रचंड स्वरूप धारण केलें आणि देवातकाला उचलून आपल्या मांडीवर घेतलें तेव्हा तो असुर तेथूनच गजाननाच्या लांब दाताला धरून झोके घेऊ लागला त्यामुळें तो दात मोडला आणि देवातक जमिनीवर पडला मग गजाननानें तोच मोडलेला दात घेऊन त्या दैत्याच्या मस्तकावर प्रहार केला आणि त्या मस्तकाचे सहस्रश तुकडे केले



## ४ गणेशाचें-गजकौतुक

गणेशाच्या अनेक कथा आणि अवतारकृत्यें यापूर्वी सांगितलीं त्याचीं आणखी कांहीं अघटित कृत्यें सांगितलीं पाहिजेत वाराणसींत तो ढुंढीराज होऊन बसला आहे ढुंढीराजानें मोठी युक्ति करून शंकराला पुन्हा काशीयास घडविला त्याचें असें झालें कीं, भृगु नंदीला वर देण्यासाठीं शंकर मंदर पर्वतावर गेले ते हा पृथ्वीवरचा दुष्काळ नष्ट करण्यासाठीं ब्रह्मदेवानें दिवोदास राजाला काशीचें राज्य दिलें दिवोदास मोठा धार्मिक होता त्याची प्रजाहि तशीच होती त्यामुळें दुष्काळ नाहींसा झाला आणि लोक सुखी झाले परंतु इकडे काशीच्या विरहानें शंकर तळमळूं लागले राजा दिवोदास काशींत असतांना आपण तेथें जावें हें त्यांना प्रशस्त वाटेना दिवोदासाच्या राज्यांत छिद्र शोधण्यासाठीं त्यांनीं आपले अनेक विश्वासू गण आणि देव रवाना केले. पण ते तेथें इतके रमले कीं दिवोदासाचें राज्य सोडून शंकराकडे परत जावें असें त्यांना मुळींच वाटेना शेवटीं शंकरानें गणेशाला या कार्यासाठीं पाठविलें.

गणेश ज्योतिषि होऊन काशीत गेले आणि आपल्या भविष्य सांगण्याच्या शैलीने त्यांनी लोकांना वेडच लावले. शेवटी दिवोदासहि त्याच्या ज्योतिषावर भाळला. शेवटी एक दिवस स्वप्नाचा अर्थ सांगताना त्यांनी दिवोदासाला म्हटले की, आजपासून अठराव्या दिवशी तुला एक ब्राह्मण भेटेल. तो सांगेल तसे तू वाग म्हणजे तुझे कल्याण होईल. अठराव्या दिवशी विष्णु ब्राह्मणाचे रूप घेऊन आला आणि तू शंकराला काशीचा वियोग घडविलास तेव्हा तू शंकराची पार्थिव पूजा कर म्हणजे दोषमुक्त होशील असे त्याने दिवोदासाला सांगितले. दिवोदासाने पार्थिव पूजा करताच शंकर काशीत प्रगट झाले आणि त्यांनी दिवोदासाला कैलासाला पाठवले।

त्रिपुरासुराच्या वधाचा मार्ग मोकळा करण्यासाठी गणेशाने असेच कलाधर ज्योतिषाचे रूप घेऊन शंकराला साह्य केले होते. असे गणेश पुराणात सांगितले आहे. गणेश कलाधराच्या रूपाने त्रिपुरासुराकडे गेला आणि मग चौसष्ट कला येतात असे त्याने त्रिपुराला सांगितले. त्रिपुर खूष झाला. तेव्हा कलाधराने आपल्या शिल्पज्ञानाने त्याला तीन उत्तम विमाने तयार करून दिली. या विमानांनी तुला वाटेल तेथे एका क्षणात जाता येईल आणि तू मनात आणशील ते होईल, फक्त शंकरच एका बाणाने या तीन विमानांचा भेद करू शकेल त्यावेळी तू नष्ट होशील असेहि त्याने सांगितले. आणि मग त्रिपुराकडे शंकराजवळ असलेली चिंतामणीची मूर्ति मागितली. त्रिपुरासुर ही मूर्त मिळविण्याच्या उद्योगाला लागला तेव्हा शंकराने त्याचा नाश केला.

गोकर्ण महाबळेश्वराची स्थापना हे गणराजाचे असेच कृत्य आहे. शंकराने प्रसन्न होऊन रावणाला आत्मलिंग दिले. हे लिंग रावणाने लंकेला नेले असते तर तो अमर झाला असता. देव त्याच्या बंदीतून कधीच सुटले नसते. त्यामुळे सारे देव गडबडले. रावणाकडून लिंग परत मिळावे असे म्हणून ते गणेशाला शरण आले.

गणराजाने ऋषिकुमाराचा वेष घेतला आणि तो गाई वळीत रावणाच्या वाटेवर उभा राहिला. संध्याकाळी नारद रावणाला भेटला. त्याने या लिंगाचे माहात्म्य रावणाला सांगितले. इतक्यात सूर्यास्त होऊ लागला. तेव्हा 'तू संध्या करीत नाहीस का? मी आपला संध्या करायला जातो' असे म्हणून नारद निघून गेला. संध्या करण्यापूर्वी लिंग कोणाकडे द्यावे असा रावण विचार करीत आहे तोच दूर्वा तोडीत असलेला ऋषिकुमार त्याला दिसला.

रावणानें त्याची आर्जवें केली तेव्हा 'लिंग मला जड झालें तर तुला तीनदा हाक मारीन आणि तू घेतल नाहींस तर खालीं ठेवीन' अशी बोली करून गणपतीनें तें लिंग घेतलें रावणाची सध्या सुरू होताच मोड्या वेळानें त्याला हाका मारण्यास सुरवात केली तीन हाका मारूनहि रावण आला नाहीं म्हणून गणपतीनें तें तेथेंच स्थापन केलें लिंग खालीं ठेवलेलें पहाताच रावण तेथ धावून आला पण तोंपर्यंत गणराज अदृश्य झाला रावणानें तें शिवलिंग उपटून काढण्याचा प्रयत्न केला त्या प्रयत्नात तें गोकर्णाकार झालें म्हणून त्या लिंगाला गोकर्ण-महाबळेश्वर म्हणतात

गणेश-विवाहाची कथा तशीच गमतीदार आहे गणेशाचा मोठा भाऊ कार्तिकेय कार्तिकेय म्हणाला माझा आधीं विवाह करा, गणेश म्हणाला माझा विवाह आधीं झाला पाहिजे तेव्हा शंकर म्हणाले, जो पृथ्वीला सात प्रदक्षिणा घालून आधीं येईल त्याचा विवाह आधीं करू कार्तिकेयाला ही अट सोपी वाटली तो मोरावर बसून निघाला पण एक पृथ्वीप्रदक्षिणा पुरी करून तो कैलासाला आला त्यावेळीं गणेशाच्या विवाहाची गडबड चालू असलेली त्याला दिसली

कार्तिकेयानें रागानें विचारलें 'हे काय ? गणपतीनें सात पृथ्वी प्रदक्षिणा कधीं केल्या ?' शिव म्हणाले, 'स्थूल शरीरानें उंदिरावर बसून पृथ्वी प्रदक्षिणा करण्याऐवजीं गणेशानें मला आणि गौरीलाच सात प्रदक्षिणा घातल्या माता पित्यांना प्रदक्षिणा घातली तर पृथ्वी प्रदक्षिणेचें फल मिळतें असं शास्त्रात सांगितलें आहे ' हें ऐकून कार्तिकेय रागानें क्रौंचगिरीवर निघून गेला तो अजून ब्रह्मचारीच आहे गणेशाचा विवाह विश्वकर्म्याच्या सिद्धि आणि बुद्धि या कन्यकांशीं झाला

गणेशपुराणात आणखी एक कथा आहे भस्मासुराचा दुरासद नांवाचा पुत्र होता त्यानें शंकराची भक्ति केली तेव्हा 'एका शक्तिशिवाय दुसरे कोणीहि तुला मारण्यास समर्थ होणार नाहीं' असा शंकरानें त्याला वर दिला मग आपल्या आसुरी स्वभावाप्रमाणें त्या दुरासदानें त्रैलोक्य जिंकलें नतर सर्व देवानीं आणि ऋषींनीं प्रथम गणेशाची आणि मग भवानीची प्रार्थना केली

देवाची प्रार्थना ऐकून पार्वतीला त्या दैत्याबद्दल अतिशय क्रोध आला तिच्या नेत्रातून आणि श्वासोच्छ्वासातून दिव्य तेज बाहेर पडलें त्या तेजामध्ये

सर्वालंकारांनीं भूषित आणि दोन दातांसह शुंडादंडानें विराजमान अशी विनायकाची मूर्ति देवांना दिसली त्या मूर्तीचें नाव त्यांनीं वक्रतुंड असें ठेवलें

मग वक्रतुंड सिंहावर आरूढ झाला आणि अनेक आयुधें घेऊन दुरासदावर चालून गेला त्यानं विशाल स्वरूप धारण करून त्या दैत्याशीं भयंकर युद्ध केलें त्याची राक्षस सेना मेली पण तो मरेना तेंव्हा विशाल देह धारण करून वक्रतुंडानें एक पाय त्या राक्षसाच्या मस्तकावर ठेवला आणि त्याला म्हटलें, ' शंकराच्या वरामुळें तुला मृत्यु प्राप्त होणार नाहीं म्हणून तू आता या काशी नगरीच्या शेजारीं पर्वत होऊन पडून रहा आणि या नगरीचें रक्षण कर ' वक्रतुंडानें दुरासदाला अशाप्रकारें पर्वत करून ठेवलें

सूर्य, शक्ति, विष्णु, शंकर आणि गणपति असें देवता-पंचायतन आहे या पंचायतनात गणेश श्रेष्ठ कसा झाला याबद्दल एक कथा मुद्गल पुराणात दिलेली आहे पंचायतनातील पाचहि देव गुणानें, तेजानें, शक्तीनें सारखेच असता गणपतीची पूजा सर्वांच्या अगोदर का करावी अशी चर्चा एकदा देवामध्यें चालली होती तेंव्हा शक्तीनें सांगितलें कीं, लंबोदर हा एकच देव असून त्याच्यापासून सर्व विश्व उत्पन्न झालें, सर्व देव त्या गणेशाचे अंश आहेत तो सर्वाधार आहे देवीचें हें म्हणणें अनेकांना पटलें पण शिव-विष्णूंना अनावर राग आला ' आपलें सामर्थ्य दावीत ' असें त्यांनीं छातीला हात लावून गणेशाला तीनतीनदा आव्हान दिलें आणि ' आमच्यापेक्षा गणेशामध्यें अधिक काहीं दिसलें तर मात्र आम्ही त्याचें पूजन करू ' असें त्यांनीं शक्तीला उत्तर दिलें

शिव-विष्णूंनीं गणपतीला आवाहन करून त्याच्यापुढें एक मोठा थोरला नैवेद्य खाण्याकरता ठेवला गणेशाला शिव-विष्णूंचें कपट माहीत होतेंच त्यांनीं त्या नैवेद्याचा एकच घास केला, आणि ' भूक लागली, आणखी द्या ' असें सांगितलें शिव-विष्णू सत्यसंकल्पी होते म्हणून त्यांनीं पुष्कळ अन्न निर्माण व्हावें असा संकल्प केला पण एकहि शीत तेथें दिसेना ! तेंव्हा ते दोघे घाबरले ' आणखी खावयास द्या ' असें म्हणत लंबोदर डोळे लाल करू लागले शेवटीं शिव-विष्णू शक्तीला शरण गेले आणि तिनें गणेशाची चित्त शांति केली अशा तऱ्हेनें गणेशाचें श्रेष्ठत्व शिवविष्णूंना मान्य करावयास लागलें

श्रीगणेशाच्या त्रिकाळ भोजनाची एक कथा दुर्वा महात्म्याच्या संदर्भात गणेशपुराणामध्यें आणि मुद्गल पुराणातहि सांगितलेली आहे मिथिलेच्या जनक राजाला आपल्या दातृत्वाचा अहंकार निर्माण झाला आपल्याकडे कोणीहि आला तरी अन्नदानानें आपण त्याला तृप्त करतों असा त्याला गर्व झाला तेंव्हा गणेशानें एका ब्राह्मणाचें रूप घेऊन त्याच्याकडे जाऊन भोजन मागितलें जनकानें त्याला उत्तम प्रकारचें अन्न तयार करून वाढविलें तें संपलें व ब्राह्मणानें आणखी अन्न मागितलें ब्राह्मण मागत होता, राजा देत होता पण कितीहि अन्न वाढून त्याची तृप्ति होईना शिजवलेलें अन्न संपलं, कोरडें अन्न संपलें पण सर्वभक्षक अग्नीप्रमाणें त्याचें समाधानच होईना राजानें हात टेंकले पण ‘मला आणखीं वाढ’ हें ब्राह्मणरूपी गणेशाचें मागणें संपेना आतां हा या राजालाच खातो कीं काय असा प्रसंग प्राप्त झाला त्या नगरात घरोघर हिंडून ‘मला खावयास द्या’ असें गणपति सांगू लागला शेवटीं एका अति दरिद्री त्रिशिरा नावाच्या ब्राह्मणानें आपल्या पूजाद्रव्यांतून शिल्लक राहिलेली एक दुर्वा गणेशाला अर्पण केली ‘एवढेंच माझ्याकडे आहे तें घेऊन तृप्त हो’ असें त्यानें म्हणताच गणेश तृप्त झाला आणि जनक राजाच्या दातृत्वाचा गर्व नष्ट झाला

## ५ पुराण–स्वरूप

*हिंदुधर्मात वेदाचे प्रामाण्य सर्वश्रेष्ठ आहे आणि त्याच्या खालोखाल पुराणांचे* महत्त्व मानतात वेदातील विषयांचेच स्पष्टिकरण पुराणात केलेले असते. व्यास महर्षींनी वेदाचे विभाग केले आणि त्यानीच नतर अठरा पुराणे रचली व्यासानीं एका वेदाचे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद असे चार विभाग करून ते आपल्या पैल, वैशपायन, जैमिनी आणि सुमतु या चार शिष्याना अनुक्रमें पढविले नतर इतिहास–पुराणें रचून ती रोमहर्षण पुत्र सूत याला पढविलीं हे असें परपरा सागते

पुराण ही अगदींच अर्वाचीन आहेत आणि त्यात नुसत्या भाकडकथाच आहेत हा अर्वाचीन विद्वानाचा पहिला समज चिकित्सक अभ्यासानतर त्या विद्वानानींच आता त्याज्य मानला आहे पुराणातील कथा अत्यत प्राचीन आहेत, आणि त्याचें अलेरचें सस्करण किंवा पुनर्रचना ही इ स च्या ४ थ्या किंवा ५ व्या शतकात वैदिक धर्माच्या पुनरुज्जीवनाच्या वेळीं झाली हा सिद्धान्त आता सर्वमान्य झाला आहे

पूर्वीची परपरा ज्यात सागितलेली असते त्याला पुराण असें म्हणतात, अशी पुराणाची व्याख्या वायुपुराणात केलेली आहे वर व्यासानीं रचलेल्या इतिहास पुराणाचा उल्लेख आला आहे त्यापैकीं इतिहास म्हणजे भारत तेंहा इतिहास आणि पुराण याच्यामधला फरक स्पष्ट केला पाहिजे शुक्रनीतींत या व्याख्या *दिलेल्या आहेत 'एका राजाच्या कृत्याच्या मिषानें पूर्वी घडून आलेल्या* अनेक हकीकती सागणें याचें नाव इतिहास सर्ग, प्रतिसर्ग, वश, मन्वतरें आणि वशानुचरित्र हीं ज्यात असतात तें पुराण ' पुराणम् पचलक्षणम् तीं हींच पाच लक्षणें होत पूर्वी पुराणहि एकच होतें व्यासानीं अठरा पुराणें केलीं

व्यासाचीं जीं हीं अष्टादश पुराणें त्याना महा–पुराणें म्हणतात ब्राह्म, पाद्म, वैष्णव, वायु भागवत, भविष्य, नारद, मार्कंडेय, अग्नि, ब्रह्मवैवर्त, लिंग, वाराह, स्कद, वामन, कूर्म, मात्स्य, गरूड आणि ब्रह्मांड अशीं हीं अठरा पुराणें आहेत यापैकीं दहा पुराणें शैव, चार वैष्णव, दोन ब्रह्मदेवाचीं, अग्नि आणि सूर्य यांचें प्रत्येकीं एक एक अशी त्याची देवतावार विभागणी आहे या महा पुराणात गणेशासबधींचीं पुराणें येत नाहींत

गणेशासंबंधींची पुराणे उप-पुराणे म्हणून समजली जातात. पण उपपुराणां-संबंधी 'पुराण निरीक्षण' ग्रंथांत त्र्यंबक गुरुनाथ काळे म्हणतात—'मत्स्य पुराणाच्या वेळीं उपपुराणांपैकीं फक्त नारसिंह पुराण (पद्मांतर्गत); नंदी पुराण (स्कंदांतर्गत); सांब पुराण (भविष्यांतर्गत); व आदित्य पुराण (तेंच) एवढींच उपपुराणें म्हणून माहीत होतीं; व तींहि मुख्य पुराणांचे भाग म्हणून माहीत होतीं.' पुढें उप-पुराणांची संख्या वाढत गेली. सूत-संहितेच्या वेळीं म्हणजे इ. स. ४०० च्या सुमारास अठरा उपपुराणें तयार झालीं. हीं पुराणें वेगवेगळ्या मुनींनीं लिहिलीं असेंच त्यावेळीं समजलें जात होतें.

महत्त्वाची गोष्ट अशी कीं, हीं जीं अठरा उपपुराणें इ. स. ४०० च्या सुमारास ज्ञात होतीं, त्यात गणेशासंबंधींची म्हणजे गणेश पुराण, मुद्‍गल पुराण यांचा समावेश नाहीं. यामुळें हीं गणेशसंबंधींचीं उपपुराणें इ. स. ४०० नंतर तयार झालेलीं असलीं पाहिजेत हें उघडच आहे. तथापि, चिकित्सेनें ऐतिहासिक-दृष्ट्या सिद्ध होणारी ही गोष्ट सांप्रदायिकांना नडणारी असल्यामुळें ते ती मान्य करीत नाहींत. आपली आराध्यदेवता ही इतर सर्व देवतापेक्षां श्रेष्ठ, असाच त्यांचा आग्रह असतो. तेव्हां सांप्रदायिकांचेंहि म्हणणें आणि युक्तिवाद विषयाच्या पूर्ततेसाठीं समजून घेतला पाहिजे.

गणेश-संप्रदाय वाढूं लागल्यानंतर त्या संप्रदायाचें महात्म्य म्हणून गणेश-पुराणें, गणेश-गीता, गणेश-सहस्रनाम अशा तऱ्हेचें वाङ्मय गणेश-भक्तांनीं तयार केलें असलें पाहिजे. आणि त्यापूर्वी मान्यता पावलेल्या वैष्णव किंवा भागवत संप्रदायाच्या अशाच तऱ्हेच्या वाङ्मयाला तोडीस तोड म्हणून हें वाङ्मय तयार झालें हें उघडच दिसतें. पण गणेश-भक्तांनीं युक्तिवादाच्या भरात महापुराण आणि उप-पुराण या शब्दांच्या अर्थांचीहि उलटापालट केलेली आहे. आणि महापुराणांना गौणत्व देऊन उप-पुराणांना श्रेष्ठत्व दिलें आहे.

'श्रीगणेश गीतेचें श्रेष्ठत्व' या पुस्तकांत श्री. हेरंबराज पाल्ग्राशास्त्री शर्मा लेखक म्हणतात:—"त्यासांनीं 'वेदशास्त्र मिश्र करून, तदुक्त यज्ञादि कर्मांनीं शुद्धचित्त झालेल्या अधिकारी जनांना क्रमानें पूर्ण शांति प्राप्त व्हावी, एतदर्थ-करितां, साधननिष्ठ बोधक अशीं ब्रह्मादि अठरा पुराणें रचिलीं. त्यांनाच, प्रथम उपदेशिल्यामुळें 'महापुराणें' अशी संज्ञा आहे. अनंतर गणेशादि अठरा सत्य पुराणांचा (कल्पारंभीं जीं भृगु-मरिचि इत्यादिकांकडून

गणेश पुराण हें गाणपत्य साम्प्रदायाचें सर्वश्रेष्ठ पुराण आहे. मुद्गल पुराणापेक्षां या गणेश पुराणाची रचना अगोदरची असावी असें तीं दोन्ही पुराणें वाचल्यानंतर दिसून येतें. चिकित्सक दृष्टीनें पाहिलें म्हणजे सर्ग, प्रतिसर्ग आदि जीं पुराणाचीं पंच लक्षणें तीं सुद्धा या गणेश पुराणांत आढळत नाहीत. उपासना खंड आणि क्रीडाखंड असे या पुराणाचे दोन भाग आहेत. उपासना खंडांत गणेश-महात्म्याचें, व्रतवैकल्यांचें, पूजोपचाराचें वर्णन असून त्या संदर्भांत कांहीं पौराणिक कथा सांगितल्या आहेत. क्रीडा खंडांत गणेशाच्या कृत, त्रेता, द्वापार आणि कलि या चार युगांतील चार अवतारांच्या विस्तृत कथा सांगितलेल्या आहेत.

हें पुराण नेहमींप्रमाणें सूतानें शौनकादिक ऋषींनाच सांगितलेलें आहे. हें पुराण खुद्द ब्रह्मदेवानें व्यासाला, व्यासानें भृगु ऋषीला, आणि भृगूनें सोमकांत राजाला सांगितलें. आणि सोमकांतानें तें सर्वत्र प्रचलित केलें अशी त्याची परंपरा दिलेली आहे. उपासना खंडांतील ब्रह्मदेवकृत सृष्टीची निर्मिति, मधुकैटभ वध, अहिल्येची कथा, त्रिपुरासुर कथा, तारकासुर वधाची कथा, कार्तवीर्याची कथा या उघड उघड इतर पुराणांतून उचलून व त्यांत गणेशमहात्म्याची भर घालून या पुराणांत आणलेल्या आहेत. गृत्समद आणि भृशुंडी यांच्या कथा मात्र स्वतंत्र दिसतात. त्या कदाचित् परंपरेनें आलेल्या प्राचीन कथा असतील. गणेश-संप्रदायाचे प्रवर्तक म्हणूनच त्यांचीं हीं चरित्रें गणेशपुराणांत आलेलीं आहेत. आणि त्यांत ऐतिहासिक सत्याचा भरपूर अंश असावा ही गोष्ट विद्वानांनींहि मान्य केलेली आहे. विष्णु-सहस्रनामाच्या धर्तीवरचें गणेश-सहस्रनाम या उपासनाखंडांतच आलेलें आहे. आणि तें खुद्द गणेशानें शंकराला कथन केलें असें तेथें म्हटलेलें आहे.

गणेशपुराणाच्या क्रीडाखंडात गणेशाच्या चार अवतारांच्या कथा सांगितलेल्या आहेत. या कथा मूलतः स्वतंत्र आहेत; म्हणजे इतर पुराणांची नक्कल किंवा उचलेगिरी असें या कथांचें मूळ स्वरूप नाहीं. पण त्या कथांचा विस्तार करतांना भागवतांतील कृष्णाच्या कथांचा पुराणकारानें अगदीं मुक्त हस्तानें येथें उपयोग केलेला दिसतो. श्रीमत् भगवद्गीतेप्रमाणें असलेली ' गणेश गीता ' नांवाची गीता याच क्रीडाखंडांत आलेली आहे. ही गणेश गीता प्रत्यक्ष गणेशानें

वरेण्य राजाला सांगितलेली आहे. या गणेश गीतेचे ११ अध्याय आणि ४१२ श्लोक आहेत. त्याच्यापैकी २२४ श्लोक हे भगवद्गीतेतील त्या त्या विशिष्ट श्लोकांची केवळ शब्दांतर केलेली अशी प्रतिकृति आहे. एवढें सांगितलें म्हणजे गणेश गीतेचें ऐतिहासिक स्वरूप अगदीं स्पष्ट होईल.

असें असलें तरी क्रीडाखंडातील इतर पुराणाच्या नकलेच्या स्वरूपाचा असलेला भाग वजा केल्यानंतरहि महोत्कट विनायक, मयूरेश्वर गजानन आणि गणेश या तीन कथांचें मूल-स्वरूप स्वतंत्र आहे हें मान्य करावें लागतें. परंपरेनें आलेल्या या प्राचीन कथा असाव्या आणि पुराणकारानें त्या आपल्या मनीनें विस्तार करून सांगितल्या असल्या पाहिजेत. म्हणूनच या कथांतील ऐतिहासिक स्वरूपाचे अंश निवडून काढतां येतात आणि प्रसंगर पुराव्यानेंहि त्याचें प्रामाण्य सिद्ध करता येतें. विद्वान संशोधकांनीं केलेल्या अशा प्रयत्नाची ओळख पुढें करून घ्यावयाची आहे. म्हणून या ठिकाणीं क्रीडाखंडातील महत्त्वाच्या कथांचा थोडक्यात परिचय करून घेऊं.

कृत युगात विनायक हा सिंहारूढ असून दशभुज आहे. त्रेतायुगांत मयूरेश्वर हा मयूरावर आरूढ होतो. त्याला सहा भुजा आहेत. द्वापार युगांत तो गजानन चतुर्भुज आणि मूषकवाहन असा आहे. कलियुगात तो धूम्रवर्ण नावानें अवतार घेणार आहे. कृत युगातील महोत्कट विनायकाची कथा अशी आहे:— अंगदेशात रौद्रकेतु नावाच्या गृहस्थाला जुळे मुलगे झाले. त्याचीं नावें देवांतक आणि नरांतक अशी त्यानें ठेवलीं. रौद्रकेतूनें तप करून सामर्थ्य मिळविलें होतें त्यापेक्षांहि या मुलांनीं अधिक सामर्थ्य संपादन केलें. देवांतकानें स्वर्ग जिंकल्या, नरांतकानें पृथ्वी आणि पाताळ पादाक्रांत केलीं. सर्वत्र असुरांचें राज्य सुरू झालें. देव दीन झाले

नाशाचे अनेक प्रयत्न केले पण आश्चर्यकारक बाललीला करून महोत्कटानें त्यानाच ठार मारलें

महोत्कट पाच वर्षांचा झाल्यावर कश्यपानें त्याचे मौंजीबंधन केलें महोत्कटाच्या सामर्थ्याचा इंद्रालाहि मत्सर वाटला इंद्रानें त्याला त्रास देण्याचा प्रयत्न केला, पण शेवटी इंद्राचें गर्वहरण झालें शेवटीं इंद्र त्याला शरण आला आणि त्यानें महोत्कटाचें विनायक असें नाव ठेवलें विनायक सात वर्षांचा झाल्यावर एकदा काशीराजा कश्यपाकडे आला आणि आपल्या मुलाच्या विवाहासाठीं त्यानें कश्यपाला पुरोहित म्हणून निमंत्रण दिलें कश्यप याग करण्यात गुंतला होता म्हणून त्यानें आपल्याऐवजीं विनायकाला घेऊन जाण्यास काशीराजाला सांगितलें

विनायक काशीराजाबरोबर निघाला वाटेत नरांतकाचा चुलता धूम्राक्ष उग्र शस्त्रासाठीं तप करीत होता तें शस्त्र खालीं येत असलेलें पाहून विनायकानें तें पकडलें आणि त्यानेंच धूम्राक्षाचा वध केला हें समजताच धूम्राक्षाचे पुत्र त्याच्या अंगावर धावून आले विनायकानें त्याना उचलून आकाशांत फेकलें तेव्हा ते गतप्राण होऊन नरांतकाच्या राजधानींत पडले हा प्रकार काय आहे हें समजताच नरांतकानें हजारों राक्षस विनायकाला आणि काशीराजाला पकडून आणण्यासाठीं पाठवले तेव्हा महोत्कट विनायकानें एक मोठा श्वास सोडून प्रचंड वादळ निर्माण केलें आणि सर्व राक्षसांची धूळधाण उडविली

विनायक काशीराजाबरोबर राजधानीस आला तेथें त्याचें सर्वांनीं मोठें स्वागत केलें पण विनायकाला मारण्यासाठीं राक्षसहि तेथें नाना रूपें घेऊन येऊ लागले तथापि विनायकानें त्या सर्वांना नाश केला राक्षसांनीं राजधानीचा नाश करण्याचेहि अनेक प्रयत्न केले पण विनायकानें सर्व लोकांचें रक्षण केलें त्यामुळें सर्व लोक विनायकाची भक्ति करू लागले हा मुलगा आल्यापासून संकटें येऊ लागलीं तेव्हा त्याला परत पाठवावा असा राजाच्या प्रधानांनीं मात्र सल्ला दिला

इकडे विनायकाचा नाश करण्याचा सर्व इलाज हरले असें पाहून नरांतकानें काशीराजाच्या राजधानीवर हल्ला केला काशीराजानें त्याला धैर्यानें तोंड दिलें पण नरांतकानें त्याला पकडून नेलें मग विनायकानें सिद्धीकडून सैन्य तयार

करून तें नरातकावर पाठविलें काशीराजाची मुक्तता केली आणि नरातकाला पकडून आणविलें पण नरातक निसटून गेला आणि विनायकाशीं पुन्हा युद्ध करू लागला विनायकानें त्याचें शिर कापून आकाशात फेकलें तें रौद्रकेतूच्या घरावर पडलें

आपला मुलगा मला हें कळताच रौद्रकेतूला दु ख झालें तो स्वर्गात देवातका कडे गेला देवातक सतापला आणि त्यानें काशीराजावर स्वारी केली काशीराजा घाबरला तेव्हा विनायकानें अष्टसिद्धींकडून असख्य सैन्य निर्माण करून देवातकाशीं घनघोर युद्ध केलें देवातकाचा पराभव झाला तेव्हा त्यानें आणि रौद्रकेतूनें अघोर यज्ञ करून एक घोडा मिळविला आणि विनायकावर हल्ला केला पुन्हा विनायकानें त्याचा पराभव केला शेवटीं विनायकानें विशाल रूप धारण करून त्याला ठार मारलें सर्वांना मोठा आनद झाला

हीं एकामागून एक सकटें येत असल्यामुळें काशीराजाच्या मुलाचा विवाह लाबणीवर पडत होता तो आटोपून विनायक कश्यपाच्या आश्रमात परत आला त्याला कश्यप आणि अदिती यानीं आलिंगन दिलें नतर कांहीं दिवसानीं विनायकानें अवतार समाप्त करण्याचा आपला हेतु आपल्या मातापितराना सागितला 'तुम्ही स्मरण कराल तेव्हा मी प्रकट होईन' असें सांगून विनायक अदृश्य झाला

त्रेतायुगात मयूरेश्वराचा अवतार होण्याचें कारण असें कीं, चक्रपाणी नांवाच्या राजाला सूर्याच्या प्रभावानें सिंधु नावाचा मुलगा झाला या सिंधूनें सूर्याला प्रसन्न करून घेतलें तेव्हा सूर्यानें त्याच्या पोटात अमृत ठेवलें आणि तें असून तेथें असेपर्यंत तू अमर रहाशील असा सिंधूला वर दिला आपण अमर झालों हें समजताच त्या सिंधु असुरानें स्वर्गाचें राज्य जिंकलें विष्णुसकट सर्व देवाना आपल्या नगरींत आणून ठेवलें सिंधूच्या त्रासानें शकरानें कैलास पर्वत सोडून मेरु पर्वताचा आश्रय केला

पार्वतीनें आणि देवानीं गजाननाची प्रार्थना केली एकदा पार्वतीनें गजाननाची मृत्तिकेची मूर्ति केली तीच सजीव झाली आणि मी सिंधु दैत्याच्या वधासाठीं तुझा पुत्र झालों आहे ' असें सागितलें शकरानें या पुत्राचें नाव गणेश असें ठेवलें हा गणेश सिंधुराजाच्या वधासाठीं अवतरला आहे हें समजताच राक्षसानीं

त्याच्या नाशानें अनेक प्रयत्न केले. पण आपल्या पालखीलांनीच गणेशानें त्या राक्षसांना ठार केलें. पुढें गणेशानें मौंजीबंधन झालें.

विनतेला अरुण आणि गरुड झाल्यानंतर तिनें आणखी पराक्रमी पुत्र व्हावा अशी कश्यप ऋषीची प्रार्थना केली. विनतेला गर्भ राहून एक अंडें झालें. हें अंडें गणेश फोडील आणि त्यांतून निर्माण होणाऱ्या पक्ष्याच्या आवाजानेंच शत्रूंचा पराभव होईल असें कश्यपानें तिला सांगितलें. मौंजीबंधन झाल्यानंतर गणेशाला हें अंडें एकदां दिसलें. तें त्यानें फोडतांच त्यांतून प्रचंड पक्षी मयूर बाहेर आला आणि तो गणेशाशीं युद्ध करूं लागला. गणेश चलाखी करून त्या पक्ष्याच्या पाठीवर बसला. तें पाहून विनता म्हणाली कीं, 'हा तुझें वाहन होईल. सर्पांचा नाश करून माझ्या पुत्रांची मुक्तता करण्यास तूं याला साह्य कर.' मयूर हें वाहन केल्यामुळें गणेशाला मयूरेश्वर हें नांव पडलें.

नंतर गणेश पाताळांत गेला आणि त्यानें सर्पांचा नाश करून विनता-पुत्रांची मुक्तता केली. शंकर मेरू पर्वतावरून कैलासावर येण्यास निघाले तेव्हां त्यांना कमलासुर आडवा आला. मयूरेश्वरानें त्याचा वध केला. पार्वतीला गणेशाचा विवाह करण्याची इच्छा झाली. नारदानें सांगितलें कीं, ब्रह्मदेवाच्या सिद्धि-बुद्धि या दोन कन्या गणेशाला योग्य आहेत. पण सगळे देव सिंधूच्या बंदींत आहेत. मग गणेश शंकरांसह सिंधुदैत्याच्या राजधानीकडे गेला. नंदिकेश्वराला सिंधूदैत्याकडे शिष्टाई करण्यास पाठविलें. पण शिष्टाईचा उपयोग झाला नाहीं. तेव्हां सिंधूशीं मोठें भयंकर युद्ध झालें. मयूरेश्वरानें सिंधूचें मस्तक तोडलें तरी त्याला नवें मस्तक येत असे. शेवटीं त्याच्या बेंबीवर बाण मारून त्याच्या पोटांतलें अमृत गणेशानें बाहेर पाडलें तेव्हां तो दैत्य मेला.

बंधमुक्त झाल्यावर ब्रह्मदेवानें आपल्या सिद्धि-बुद्धि या कन्यांचें स्वयंवर मांडलें. 'या कन्या आम्हाला दे' असा आग्रह देवांनीं ब्रह्मदेवाला केला. पण त्या कन्यांनीं गणेशालाच वरलें. पुढें गणेशानें आपलें मयूर वाहन आपला भाऊ कार्तिकेय याला दिलें. आणि सिंदूरवधासाठीं पुन्हा तुझा पुत्र होईन असें पार्वतीला आश्वासन देऊन अवतार-समाप्ति केली.

द्वापारयुगात सिंदुरासुराला मारण्यासाठीं गणेशानें तिसरा अवतार घेतला. सिंदुरासुर हा ब्रह्मदेवाच्या जांभईपासून निर्माण झाला. तूं मिठी मारशील तो

ठार होईल असा वर महादेवानें त्याला दिला या वराचा प्रयोग सिंदुरानें प्रथम महादेवावरच करायचें ठरविलें मग महादेव पळू लागला सर्व देवांना त्यानें पराभूत केलें मग पार्वतीच्या पोटीं गजानन जन्माला आले मला वरेण्यराजाकडे पोंचवा असें त्यानें सांगताच नंदिकेश्वराबरोबर शंकरानें त्याला वरेण्याच्या घरीं पाठविलें वरेण्याची राणी निद्रिस्त होती तिच्या शेजारीं हें बालक ठेवण्यात आलें

चार हात आणि सोंड असलेलें हे बालक राजानें घाबरून अरण्यात नेऊन टेवलें तेथें गजाननाला पराशर ऋषीनें वाढविलें पराशराच्या आश्रमात त्याला उंदीर वाहन प्राप्त झालें मग गजानन उंदिरावर बसून सिंदुरासुराच्या राजधानीकडे गेला आणि त्याच्याशीं मल्लयुद्ध करून त्यानें सिंदुराला ठार केलें त्यावेळीं सिंदुराच्या अंगाच्या तांबड्या रंगानें गजाननाचें अंगहि तांबडें झालें मग सर्व देव गजाननाच्या दर्शनाला आले

कलियुगात पुढें गणेशाचा धूम्रकेतु नांवाचा अवतार होणार आहे तो निळ्या घोड्यावर आरूढ होईल आणि तलवारीनें पापी लोकांना ठार मारून सत्य युगाची स्थापना करील



# ७ मुद्गल पुराण

गाणपत्य सांप्रदायात गणेशपुराणाच्या खालोखाल महत्त्वाचें आणि गणेश-पुराणाच्या खालोखाल लोकप्रिय असें पुराण म्हणजे मुद्गल पुराण  हें पुराण गणेश पुराणानंतर रचलेलें आहे हें तर उघडच आहे  कारण केवळ कथाच्या दृष्टीनें त्याचें स्वरूप संकीर्ण असें आहे  खुद्द गणेश पुराणातल्या सर्व कथा त्यात सारांश रूपानं मांडलेल्या आहेतच  पण शिवाय गणेशासंबंधीच्या अन्य पुराणांतील कथा आणि इतर कथानकेंहि गणेशमहात्म्य जोडून या पुराणात आणलेल्या आहेत  त्यामुळें कथाच्या दृष्टीनें हें पुराण म्हणजे नुसतें संकलन आहे

हें पुराण गणेश पुराणानंतरचें असलें तरी गणेशपुराणाहून तें प्राचीन आहे असा आभास मात्र त्या पुराणकारानं निर्माण केलेला आहे  या पुराणाची परंपरा व्यासांपर्यंत जोडण्याचाहि भाग त्याला राहिलेला नाही  हें पुराण मुद्गल ऋषीनें दक्षाला सांगितलें आणि तेंच सूतानं शौनकाला कथन केलें  हा दक्ष म्हणजे सतीचा पिता आणि शिवाचा सासरा दक्ष प्रजापति! आणि दक्ष यज्ञविध्वंसा

नंतर मुद्‌गल ऋषी त्याच्याकडे गेले तेव्हा त्यानीं या कथा सांगितल्या पण दक्षाला म्हणून सांगितलेल्या या कथा पौराणिक कालाच्या दृष्टीनेंहि दक्षानंतर घडलेल्या आहेत मग 'असें झालें' असा भूतकाल वापरून मुद्‌गल ऋषींनी त्या कथा दक्षाला कशा सांगितल्या?

मुद्‌गलऋषींनें ज्या दक्षाला या कथा सांगितल्या तो दक्ष प्रजापति नसून वेगळाच दक्ष असावा असा माझा तर्क आहे गणेश पुराणाच्या उपासना खंडात सोमकांत राजाचा आठवा पूर्वज म्हणून एका दक्ष राजाची कथा आलेली आहे अंध, मुका, बहिरा आणि सर्वांगाला व्रण झालेला असा हा दक्ष मुद्‌गल ऋषीच्या अंगावरून आलेल्या वायूनें दिव्य देही झाला व पुढें मुद्‌गल ऋषींचा मंत्रोपदेश घेऊन तपश्चर्येनें त्यानें राज्यहि मिळविलें तेव्हा याच दक्षाला मुद्‌गल ऋषींनें हें पुराण सांगितलें असावें पण या पुराणाबद्दल अतिप्राचीनतेचा आभास निर्माण करण्यासाठीं नंतरच्या रचनाकारांनें या दक्षाला दक्ष-प्रजापति करून टाकलें असावें, असा माझा तर्क आहे

कथासंग्रहाच्या दृष्टीनें मुद्‌गल पुराण हें गणेशपुराणासह इतर अनेक पुराणांतील कथांनें सकरून असल तरी या पुराणाचा हेतु गणेश पुराणापेक्षा भिन्न आहे कथा-कथन हा गणेशपुराणाचा एक प्रधान हेतु आहे तर गणेश तत्त्वाचें आध्यात्मिक स्पष्टीकरण हा मुद्‌गल पुराणाचा प्रधान हेतु आहे कथा सांगताना ती कथा कल्पित आहे असें वाचकाला वाटलें तरी त्याची पर्वा मुद्‌गल पुराण रचणाऱ्यानें मुळींच बाळगलेली नाहीं गणेश ही सर्वश्रेष्ठ देवता आहे, तीच या विश्वाचा निर्माता आणि नियंता आहे, इतर सर्व देवता या गणेशाच्या केवळ अंशभूत आहेत, सर्व कांहीं गणेशापासून निर्माण झालें आणि त्याचा लयसुद्धा गणेश स्वरूपात होणार ही भूमिका गणेश पुराणाप्रमाणेंच मुद्‌गल पुराणाचीहि आहे पण गणेश गीता वगळली तर गणेश तत्त्वाची, गणेश हें परब्रह्म आहे अशी सोपपत्तिक मांडणी गणेशपुराणात फारशी केलेली नाहीं ही मांडणी मुद्‌गल पुराणात विस्तारानें केलेली आहे

गणेशपुराणात गजाननाचे चार युगांतील चार अवतार विस्तारानें सांगितलेले आहेत मुद्‌गल पुराणात गणेशाचे वक्रतुंड, एकदंत, महोदर, गजानन, लंबोदर, विकट, विघ्नराज आणि धूम्रवर्ण असे आठ अवतार कथन केले आहेत आणि

हे अवतार गणेशपुराणातील अवतारांहून भिन्न आहेत या आठ अवतारांच्या मुद्गल पुराणातील कथा थोडक्यात पुढे दिलेल्या आहेत त्या वाचल्यानंतर पुराणकाराचा हेतु या कथांचें कथन करण्याचा नसून काम क्रोधादि षड्रिपूंचे परिणाम आणि त्या विकाराच्या नियमनाचें महत्त्व वाचकाच्या मनावर बिंबविणें हाच आहे हें सहज दिसून येइल

आध्यात्मिक तत्त्वनिरूपण हा मुद्गल पुराणाचा हेतु आहे आणि वाचकाच्या मनावर या विवेचनाचा ताण पडू नये या हेतूनें हातांशीं मिळतील त्या कथा मधून मधून सांगितलेल्या आहेत गणेशाच्या अनेक नावांचें स्पष्टीकरण त्यांचा आध्यात्मिक अर्थ देऊनच केलेलें आहे पुराणामधून आलेल्या सगळ्या कथा या कथा नसून रूपकें आहेत असें काहीं लोक मानतात तर या कथांत जें सांगितलेलें आहे तसें पूर्वी प्रत्यक्ष घडलेलेंच आहे अशी भाविकांची श्रद्धा असते पुराण कथांतून ऐतिहासिक सत्य निवडून काढून मोठमोठ्या विद्वानांनीच पुराणांतील सगळ्या कथा म्हणजे रूपकें ही समजूत खोडून काढली आहे पुराणांतली प्रत्येक कथा म्हणजे इतिहासच आहे असें म्हणण्याची सोयच नाहीं

पुराणांतील कथांत काहीं ऐतिहासिक सत्य असतें, तर काहीं कथा रूपकात्मक असतात पण मुद्गल पुराणांतल्या अनेक कथा पुराणकारानेंच रूपकें म्हणून सांगितल्या आहेत असें नाहीं तर वाचकालाहि आपण हें रूपकच सांगत आहोंत हें स्पष्ट कळावें अशीहि त्याची इच्छा दिसते म्हणून आपल्या रूपका वर त्यानें कथेचा पडदा सोडला असला तरी तो अत्यंत झिरझिरीत आहे आणि त्यामुळें त्या कथामागचें रूपक वाचकाच्या निदर्शनास दृष्टीस पडतें स्वतःला श्रद्धावान्, सनातन धर्माभिमानी म्हणविणाऱ्या काहीं विद्वानांनीं अनेक कथांचे आध्यात्मिक अर्थ लावण्याच्या भरीस पडून पुराण कथांना कल्पित रूपकाचें स्वरूप कसें आणलें आहे तें पुढच्या एका प्रकरणांत दिलेलच या ठिकाणीं मुद्गल पुराणांत खुद्द त्या पुराणकारानें कशीं रूपकें केलीं आहेत तीं त्याच्याच शब्दांत पाहू

मुद्गल पुराणाचे नऊ खंड पाडलेले असून त्यांत गणेशाच्या आठ अवतारांच्या कथा सांगितलेल्या आहेत

दुर्वास मुनींचें तपस्तेज आणि आपली कामातुर अवस्था पाहून इंद्र खिन्न झाला आणि त्याच्या वीर्यपातातून मत्सरासुर निर्माण झाला याचा पृथ्वीनें प्रतिपाळ केला पुढें त्याने दुर्बुद्धीची कन्या मदकरा हिच्याशीं विवाह केला तपश्चर्या करून त्यानें शंकराकडून वर मिळविले पुढें त्याला 'सुदरप्रिय' आणि 'विषयप्रिय' या नावाचे दोन पुत्र झाले नंतर मत्सरानें सर्व देवांचा पराभव करून त्रैलोक्यावर राज्य करण्यास सुरवात केली देव दीन झाले आणि त्यानीं गणेशाची प्रार्थना केली तेव्हा वक्रतुंडाचा अवतार झाला मत्सरासुर वक्रतुंडाला शरण आल्यावर निष्काम कर्म करणाऱ्याच्या वाटेला तू जाऊं नकोस अशी गणेशानें त्याला आज्ञा केली

मत्सर हा इंद्राच्या पातनीलाच पुजलेला आहे आणि निष्काम कर्म करणाऱ्याना मत्सराची बाधा होण्याचें कारण नाहीं हा वक्रतुंड चरित्राचा आशय आहे

'मी मोठा' असा एकदा ब्रह्मदेवाला गर्व झाला तेव्हा त्याच्यापासून दंभासुर जन्माला आला त्यानें सर्व देवानाहि देशोधडीला लावलें पुढ ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेनें गणेशानें 'ऋद्धिसिद्धिपति' या नावानें ब्रह्मदेवाच्याच घरीं अवतार घेतला त्यानें दंभासुराला वठणीवर आणलें सिद्धि म्हणजे सफलता सिद्धि आणि बुद्धि या दोन माया असून त्या अनुक्रमें गणेशाच्या डाव्या व उजव्या मांडीवर बसतात

मेघारी, शोचन, हरण असे पाच पराक्रमी पुत्र झाले त्यानें देवासह त्रैलोक्य जिंकल्यावर महोदराचा अवतार झाला महोदरानें मोहाला शांत केलें

शकुनीचा पुत्र दुर्बुद्धि याला शिवपुत्र निग्रहरानें ठार मारलें दुर्बुद्धीचा पुत्र ज्ञानारि म्हणून होता आपल्या बापाच्या वधाचा सूड घेण्यासाठीं तपश्चर्या करून त्यानें देवाना पळवून लावलें, तेंहा गणपतींनीं वैकुंठात लक्ष्मीच्या उदरीं जन्म घेतला ज्ञानारीला सुबोध नावाचा मुलगा झाला तो गणेशभक्त होता त्याचा ज्ञानारीनें खूप छळ केला शेवटीं गणेशानें ज्ञानारीचा जीवभावच नष्ट केला.

एकदा कैलासपर्वतावर शंकरपार्वती बसलीं असता तेथें कुबेर आला पार्वतीचें स्वरुप पाहून तो मोहित झाला व तिच्याकडे टक लावून पाहू लागला त्याच्या कृत्यातून लोभ नावाचा असुर निर्माण झाला याचा तारासुरानें प्रतिपाळ केला पुढें लोभासुर त्रैलोक्याला गाजू लागला तेंहा गजाननानें त्याला पाताळात दडपलें

अभिनंदन नावाचा राजा हिमालयावर यज्ञ करणार होता पण इंद्राला हविर्भाग द्यायचा नाहीं असें त्यानें ठरविलें होतें हें इंद्राला समजताच त्यानें काळाला त्या यज्ञाचा विध्वंस करण्यास पाठविलें काळानें विघ्नासुर रूपानें कर्मभूमीवरील सर्वच यज्ञाचा विध्वंस केला शेवटीं गणपतीनें पार्श्वाच्या घरीं विघ्नराज हा अवतार घेतला आणि आपल्या अंकुशानें विघ्नासुराचें मर्दन केलें

भस्मासुराला मारण्यासाठीं विष्णूनें मोहिनीचें रूप घेतलें त्या मोहिनीला पाहून शंकरहि तिच्या मागें लागले शेवटीं विष्णूनें आपलें रूप धारण करताच शंकर स्थिर झाले आणि त्याच्या गलितवीर्यापासून श्याम वर्णाचा आणि तांबड्या डोळ्याचा एक असुर उत्पन्न झाला. हाच क्रोधासुर. या क्रोधासुरानें आदेश नगरी निर्माण करून ती आपली राजधानी बनविली आणि ब्रह्मांडावर विजय मिळविण्यास सुरवात केली शेवटीं गणपतीनें लंबोदर अवतार धारण करून क्रोधासुराची शांति केली.

सृष्टि निर्माण करताना ब्रह्मदेवाला मोह निर्माण झाला आणि त्याच्या श्वासापासून 'मायाकर' नावाचा पुरुष निर्माण झाला यानें विश्व जिंकलें

तेव्हा शेषाच्या हृदयातून गणेश लंबोदर रूपाने बाहेर आले. लंबोदरानी बिंदुरूप आणि ज्योतिरूप असे आपल्या हातातील कमळ फेकून मायाकराला ठार मारले.

शंकर सर्वस्वी आपल्या स्वाधीन आहेत, आपल्यासारखी धन्य स्त्री कोणी नाहीं असा विचार मनांत येऊन पार्वती एकदां हसली तिच्या या हसण्यापासून एक पुरुष निर्माण झाला त्याचें नाव ममासुर. याला मारण्यासाठीं गणपतीनें विघ्नेश्वर अवतार घेतला.

धर्मज्ञ नावाच्या पुरुषाला यज्ञधुग नावाचा पुत्र झाला. याचा वध करण्या-साठीं शूर्पकर्णानें अवतार घेतला सूर्याला गर्व झाला. आणि त्याच्या शिंकेतून 'अहम्' नावाचा असुर निघाला धूम्रवर्ण अवतार घेऊन गणपतीनें या अहंकडून शरणागति घेतली

काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर या षड्रिपूंचर हीं रूपकें आहेत हें वेगळें सांगण्याचें कारण नाहीं



८

## गृत्समद

आतांपर्यंत श्री गणेशासंबंधीच्या भिन्नभिन्न पौराणिक कथा सांगितल्या. गणेश देवतेचें वर्णन ज्या पुराणांत केलेलें आहे त्या पुराणांचें स्वरूप पाहिलें. या गणेश देवताच्या उपासनेचा प्रसार ज्यांनी केला त्यांची माहिती आतां पहावयाची आहे. गणेश-संप्रदायाचा शोध करतांना पुराणांतील कथांचा आधार तर घेणें आवश्यकच आहे. पण ऐतिहासिक दृष्टीचा आणि इतर साधनांचाहि उपयोग केला पाहिजे. या संप्रदाय प्रवर्तकाचा शोध घेताना संप्रदायाचें आणि देवतेचेंहि स्वरूप निश्चित होणार आहे.

वैदिक व्यक्ति आहे 'गणाना त्वा गणपतिम् हवामहे' या गणेशाच्या म्हणून मानल्या गेलेल्या वैदिक मत्राचा गृत्समद हा द्रष्टा आहे या मत्राचा तो ऋषि आहे त्यामुळे तो मत्र म्हणण्यापूर्वी 'गणानां त्वा शौनको गृत्समदो गणपतिर्जगति' असा गृत्समदाचा प्रथम उच्चार करावा लागतो गृत्समद हे खुद्द गणपतीचेहि एक नाव आहे ज्याचा मद गळत आहे तो गृत्समद ही त्या शब्दाची व्युत्पत्ती लक्षात घेतली म्हणजे हा शब्द गणपतीला आणि हत्तीला लागू पडणेच योग्य आहे

गृत्समद हा वैदिक ऋषी या नात्याने ऐतिहासिक व्यक्ति आहे पण त्याचे वैदिक कालातील स्वरूप शोधण्यापूर्वी त्याची पौराणिक कथा पाहिली पाहिजे ती कथा अशी—रुक्मागद नावाचा राजपुत्र एकदा शिकारीला गेला असता विश्रातीसाठी वाचक्नवि ऋषीच्या आश्रमांत गेला ऋषि स्नानाला गेले होते आश्रमात त्याची मुकुदा नांवाची सुदर पत्नी होती तिच्याकडे रुक्मागदाने पाणी पिण्यास मागितले

रुक्मागद हाहि सुदर होता त्याला पहाताच मुकुदेला मोह उत्पन्न झाला आणि ती त्याला आपली इच्छा पूर्ण करण्यास सांगू लागली रुक्मागदाने तिला तिच्या दुष्ट वासनेपासून परावृत्त होण्याचा उपदेश केला पण ती ऐकेना तिने त्याचा हात धरला तेव्हा रुक्मागदाला क्रोध आला त्याने तिचा हात झिडकारला आणि तो आश्रमातून निघून गेला हे पाहून मुकुंदेलाहि सताप आला तुला कुष्ठ होईल असा तिने त्याला शाप दिला

रुक्मांगदाला पुढे सर्वांगावर कोड फुटले त्याने नारदाच्या उपदेशाने चिंतामणि क्षेत्रांत गणेशाची तपश्चर्या केली आणि तो मुक्त झाला इकडे रुक्मागद निघून गेला तरी मुकुदेच्या मनात तो इतका भरला होता की, तिला त्याच्याशिवाय काहीं सुचेना ती अतिशय आतुर झाली आणि वियोगाने विव्हल होऊन तेथेच पडून राहिली तेथेच तिला किंचित् निद्रा आली इतक्यात तेथे इद्र आला मुकुदा रुक्मागदासाठी विव्हळ झाली आहे हे त्याने ओळखले आणि स्वत रुक्मागदाचे रूप घेऊन त्याने तिला जागृत केले

हा रुक्मागदच आहे असे मुकुदेला वाटले आणि ती सतुष्ट झाली इद्राने तिची इच्छा पूर्ण केली मुकुदेला गर्भ राहिला नऊ महिने पूर्ण होताच ती

प्रसूत झाली आणि तिला पुत्र झाला. वाचक्नवि ऋषीला मुकुंदेच्या व्यभिचाराची कल्पना नव्हती. त्याला पुत्रजन्माने आनंद झाला. त्याने मुलाचे नाव गृत्समद असे ठेवले. गृत्समद मोठा झाल्यावर वाचक्नवीने त्याला वेदशास्त्रामध्ये पारगत केले आणि तो मोठा विद्वान झाला.

एकदा मगध राजाच्या घरी श्राद्धासाठी मोठमोठे ऋषि जमले होते त्यात गृत्समदहि होता. तेथे शास्त्रचर्चा चालू असताना गृत्समदाचा अत्रि ऋषींबरोबर वाद झाला गृत्समदाचे अभिमानयुक्त भाषण ऐकून अत्रिऋषींनी त्याचा धिक्कार केला. ते म्हणाले, 'गृत्समदा, तू ऋषिपुत्र नसून रुक्मांगदापासून जन्माला आलेला आहेस तू वाचक्नवीचा औरस पुत्र नसल्यामुळे तुझी व आमची बरोबरी होणार नाही. तू येथून निघून जा.' हा अपमान गृत्समदाला असह्य झाला तो रागाने थरथर कापत म्हणाला, 'ऋषीहो, तुमचे हे भाषण जर असत्य ठरले तर मी तुम्हाला शापून भस्म करीन' गृत्समद तेथून निघाला आणि आश्रमात आला

आश्रमात आपल्या मातेला पहाताच त्याचा क्रोध उसळून आला. तो तिला म्हणाला, 'दुष्टे, बोल, माझा जन्म कोणापासून झाला ? सत्य सांग नाहीं तर मी तुला भस्म करीन' गृत्समदाचे ते उग्र स्वरूप पाहून मुकुंदा भीतीने कापू लागली. तिने गृत्समदाला त्याची जन्मकथा सांगितली ऋषींचे म्हणणे खरे ठरले हे पाहून गृत्समदाला अधिकच दुःख झाले. तो संतापून म्हणाला, 'तुझ्या पापाचे फळ भोगण्यासाठी तू काटेरी बोर होशील तुला पुष्कळ फळे येतील पण त्याला कोणीहि प्राणी स्पर्श करू शकणार नाही. हा शाप ऐकून मुकुंदेलाहि क्रोध आला. ती म्हणाली, 'मी पापिणी असले तरी तुझी माता आहे. तू मला कठोर शाप दिलास, तेव्हा तुलाहि पापाणहृदयी आणि क्रूरकर्मा असा पुत्र होईल' मुकुंदा काटेरी बोर झाली. आणि गृत्समदहि दुःखित अन्तःकरणाने तपश्चर्येला निघून गेला

दिले त्याला 'गणानां त्वा' मंत्राचा ऋषि केले आणि वेदवेत्या मंत्रद्रष्ट्यात तुझी गणना होईल असा त्याला वर दिला

गृत्समदानें ज्या पुष्पक क्षेत्रात तपश्चर्या केली तें भद्रक क्षेत्र म्हणून प्रसिद्ध झालें गृत्समदानें तेथें 'वरद-विनायका'ची स्थापना केली गृत्समदाच्या छिंकेपासून शास्त्रदीप्रमाण लाल असा एक पुत्र निर्माण झाला हाच मुकुंदेच्या शापानें उत्पन्न झालेला त्रिपुरासुर होय असेंहि गणेश पुराणात सांगितले आहे

ही गृत्समदाची पौराणिक कथा झाली वैदिक वाङ्मयावरून त्याचें जें चरित्र कुळाला येतें तें आचार्य विनोबा भावे यानीं 'गृत्समद' या आपल्या काव्यमय निबंधात वर्णन केलें आहे ऋग्वेदातील समग्र द्वितीय मंडल हें गृत्समदानें रचलेलें आहे शुद्ध ऋग्वेदातील हा प्राचीनतर भाग असून गृत्समदाचा काल वीस हजार वर्षांमागचा तरी टरेल असें इतिहासशाचा हवाला देऊन विनोबानीं म्हटलें आहे गृत्समद हा जसा ज्ञानी, भक्त आणि कवि होता तसाच गणिती, विज्ञानवेत्ता, कृषि-संशोधक आणि समाजनेता विणकर होता आजच्या विद्यांत कापसाची पहिली लागवड गृत्समदानें केली त्यानें कापसाची जी पैदास केली त्या जातीच्या कापसाला गार्त्समदम्' असें नाव लोकानीं दिलें 'गॉसिपियम्' हें लॅटिन रूप कदाचित 'गार्त्समदम्' या शब्दावेहि असल। *गणितात गुणाकाराचा शोध यानेंच लावला त्याच किरणांच्या गर्मीच्या वाटीवर* होणाऱ्या परिमाणाचें यानें संशोधन केलें विनोबांनीं गृत्समदाचें हें चरित्र, आपल्या जीवन विषयक तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें मांडलें आहे त्यात साहजिकच त्यानीं गृत्समदाच्या पौराणिक कथेचा विचार केलेला नाहीं

समाजेतिहासाच्या दृष्टीनें गृत्समदाच्या चरित्राचें स्पष्टीकरण लोकनायक अणे यानीं केलेलें आहे गृत्समदाची पौराणिक जन्मकथा विचारात घेतली तर तो वर्णसंकरानें उत्पन्न झालेला होता हें पुराणकारानें मुळीच लपविलेलें नाहीं वर्णसंकरानें उत्पन्न झालेल्या जातीला पूर्वाचार्य 'व्रात्य' म्हणतात अशी बोधायनानें व्रात्य शब्दाची व्याख्या केलेली आहे तात्पर्य, गृत्समद हा व्रात्य होता मगध राजाच्या घरीं श्राद्धाच्या वेळीं ऋषींनीं त्याचा अपमान केला याला त्याची ही जातच कारणीभूत होती 'ब्राह्मणापेक्षाहि श्रेष्ठ असा मला ब्रह्मवेत्ता कर' असा त्यानें गणेशाकडे वर मागितला त्याची ही मागणी अर्थपूर्ण आहे गणेशानें त्याला ब्राह्मणत्व दिलें असें तर पुराणकारच सांगून राहिला आहे व्रात्य

त्याला पुष्कळ वर्षांनीं एक पुत्र झाला त्याचें नाव दक्ष तो जन्मत च मुका व बहिरा असून त्याच्या सर्व अंगावर क्षतें पडलेलीं होतीं भीम राजानें अनेक वैद्य मणि, मत्र औषधी असे अनेक उपाय करून पाहिले पण गुण येईना शेवटीं कंटाळून आणि सतापून त्यानें त्या रोगी मुलाला आणि आपल्या राणीला राज्यातून हाकून दिलें

ती राणी आपल्या मुलाला घेऊन रानोमाळ आणि गावोगाव हिंडू लागली तिचे खूप हाल झाले एकदा आपल्या मुलाला एका देवळात ठेवून ती भिक्षा मागायला गेली इतक्यात मुद्गल ऋषीच्या अंगावरून आलेला वारा त्या मुलाच्या अंगाला लागला आणि तो रोगमुक्त झाला या मुलानें मोठी तपश्चर्या करून गणेशाला प्रसन्न करून घेतलें पण गणेशान सागितलें कीं, दक्षा मी तुला वर देत नाहीं मुद्गल हा माझा महाभक्त आहे त्याच्या अंगावरून आलेल्या वायूनें तू रोगमुक्त झालास तेव्हा मी तुला वर दिला तर त्या भक्ताचा अपमान केल्यासारखें होईल म्हणून तू मुद्गल ऋषीकडे जा मग दक्ष मुद्गल ऋषीकडे गेला त्यानें दक्षाला मत्रोपदेश केला पुढें कौंडिन्य नगराचा राजा निपुत्रिक मेला होता त्याचें राज्य, हत्तिणीनें दक्षाच्या गळ्यात रत्नमाला घातल्यामुळें दक्षाला मिळालें

भृशुंडी हा मुद्गल ऋषींचाच शिष्य होय त्याची कथा थेट वाल्मिकीच्या कथेप्रमाण आहे दडकारण्याशेजारीं नदन नावाच्या नगरांत दुष्ट या नावाचा एक धीवर होता लहानपणापासून तो चोऱ्या करण्यात पटाईत होता पुढ द्यूत, मद्य वगैरे अनेक व्यसनें त्याला लागलीं गावातल्या लोकाना त्यानें हैराण केलें तेव्हा लोकानीं त्याला गावाबाहेर हाकून दिलें मग तो दुष्ट अरण्यात जाऊन वाटमारी करू लागला

एकदा त्या मार्गानें मुद्गल ऋषि जात होते त्याना पहाताच त्या धीवरानें 'आता तुला ठार मारतो' असें म्हणून तलवार उपसली पण मुद्गलाचा स्पर्श होताच त्याची बुद्धि पालटली त्याच्या हातातली तलवार गळून पडली मुद्गल शात होते उपरति झालेला तो धीवर त्याना शरण आला तेव्हा त्याच्या मस्तकावर वरदहस्त ठेवून मुद्गलानीं त्याला गणेश मत्राचा उपदेश केला आपल्या हातांतली काठी त्याच्या समोर रोवून त्याला सागितलें कीं, मी परत

येईपर्यंत किंवा या शुष्क काष्ठाला पालवी फुटेपर्यंत तू येथेंच एकाग्र मनानें मनजप करीत रहा.

पुढे कांहीं काळानें मुद्गल ऋषि फिरत फिरत त्या ठिकाणीं पुन्हा आले. त्यावेळीं त्या काठीला पालवी फुटली होती. त्या धीवराच्या अंगावर वारुळें वाढलीं होतीं आणि त्या धीवराच्या भुवयामधून एक सोंडहि निर्माण झाली होती मुद्गलानीं त्याचें नाव भृशुंडी असें ठेवलें. भृशुंडीनें आपला आश्रम स्थापला आणि तेथें तपश्चर्या करून गणेशाला प्रसन्न करून घेतलें

भृशुंडीची कथा गृत्समदाप्रमाणेंच अनार्य लोकजातींनीं आर्य जातींत प्रवेश आणि मान्यता मिळविल्याची द्योतक आहे भृशुंडी हा प्रत्यक्ष शुंडाधारीच होता, म्हणजे तो हत्तीचें रुपडें घालणाऱ्या अशा गजानुयायी लोक जातींतील होता. कश्यप पुत्र महोत्कट विनायकाला सोंड नसल्यामुळें भृगुडीनें प्रथम गजानन म्हणून त्याला मान्यता दिली नाहीं अखेर विनायकानें गजशुंडाधारी असे रूप त्याला दाखविलें असेंहि गणेश पुराणात सांगितलें आहे गणेशाला गजशिर प्राप्त करून देण्यास भृशुंडी सारखे गजानुयायीच कारणीभूत असावेत भृगु ऋषी संबंधींचा खुलासा पुढच्या प्रकरणात करावयाचा आहे

वैद्यगणपति म्हणून कोणी गणपति नाहीं पण गणेशसहस्रनामात गणेशाचीं अशीं किंत्येक नांवें दिलेलीं आहेत कीं त्यामुळें तो सहजच भिषग्वर्य ठरेल व श्री दा सातवळेकर हे सहस्रनाम हा त्या त्या विभूतीचा साधत इतिहासच असतो असें मानतात आणि त्यानीं 'पुरुषार्था'च्या गणशाकात गणेश-सहस्रनामातून गणशाचें गणितज्ञ, मनज्ञ, वेदवेत्ता, योगी, गायनपटू असें विविध चरित्र वर्णन केलें आहे ! सहस्रनाम हे इतिहास म्हणून ग्रथित केलेले नसतं तें भाविकाच्या उपासनेचें साधन म्हणूनच निमाण केलेलें असतें सहस्रनामात साग्रत इतिहास सापडतो ही कल्पना अतिरेकी म्हणून सोडली तरी सहस्र नामातील काहीं वैशिष्ट्यपूर्ण नाव त्या देवतेच्या इतिहासावर प्रकाश टाकू शकतील

गणेशसहस्रनामातील काहीं नावें या दृष्टीनें विचार करण्यासारखीं आहेत गदहन्, गदापह, गदाडम्बरखडक, गदर्दर्पघ्न हीं नावें वैद्य किंवा रोग चिकित्सक या अर्थाचीं आहेत गल्त्कुष्ठिव्यथाहृता गल्त्कुष्ठिसुखप्रद गरदमदक, गरसतापशमन, दूताविस्फोटनाशन, गदग्रस्तपरित्राता गद-गर्वप्रशासन औषधीपति सर्वभेषनभिषक गर्भामयनिवारक, गर्भदोषदहन् गर्भापद्विनिवारक, गर्भशोधनुत, गर्भसतोपसाधक, गर्भाधार, गर्भाश्रय, गर्भत्राता, गभगोता, गर्भपुष्टिकर, गर्भगौरवसाधन गर्भद, गर्भप्रद या नावाचा अर्थ स्पष्ट आहे गणपति वैद्यकी करीत होता आणि वरनिर्दिष्ट रोग तो बरे करीत असे असा उत्तान अर्थ यांतून काढण्याचें वास्तविक कारण नाहीं गणेश ही देवता ज्यानीं पूज्य मानली त्या सांप्रदायाच वैद्यकी हें वैशिष्ट्य होतें असा तर्क करणें अधिक सयुक्तिक ठरेल

गणपति ही अथर्ववेदीय दैवत म्हणून मान्य केली कीं, या औषधी प्रकरणाचा आणि रोगनिवारणाचा सबंध स्पष्ट होतो अथर्ववेदाचें दुसरें नाव भृग्वगिरस वेद असें आहे भृगु आणि अगिरा हे दोन ऋषि या वेदाचे द्रष्टे आहेत अथर्ववेदाचें स्वरूप दुहेरी आहे त्यात जारण-मारणाचे अभिचार प्रयोग आहेत तसेच भैषज्य प्रयोगहि आहेत भूताचे मुख्य जे ब्रह्मन् त्याच्या मधील भृगु आणि अगिरा या दोन जाती आहेत असेंहि काहीं विद्वानाचे मत आहे तथापि, औषधी विद्या ही भृगूची आहे अथर्ववेदातील अभिचाराला

ही भैषजाची किंवा औषधी विद्येची जोड मागाहून मिळाली आर्यांनी अभिचाराबरोबर ही औषधी विद्याहि स्वीकारली गणेशाचें हितकारी आणि मारक, विघ्नकर्ता आणि विघ्नहर्ता असें जें दुहेरी स्वरूप आहे तें या अथर्ववेदाच्या दुहेरी स्वरूपाला धरूनच आहे गणपतीशीं वैद्य-विद्येचा, रोग निवारणाचा जो संबंध जडला तो या अथर्ववेदातूनच होय

प्रत्येक देवतेला कोणत्या तरी वनस्पती प्रिय मानलेल्या आहेत विष्णूला तुळस, शिवाला बेल, तशाच गणपतीला दुर्वा, शमी, मंदार या वनस्पती प्रिय मानलेल्या आहेत पुराणकारांनीं आपल्या पद्धतीप्रमाणें या वनस्पतींचा आणि गणपतीचा संबंध जोडणाऱ्या कथा रचल्या या गणपतीला प्रिय असलेल्या वनस्पतींचें एक वैशिष्ट्य आहे पण तें वैशिष्ट्य पहाण्यापूर्वी गणेश आणि मुद्गल पुराणातल्या या वनस्पतींच्या कथा पाहू

औरव नावाच्या ऋषीला शमीका नावाची मुलगी होती औरवानें तिचा विवाह धौम्य ऋषीचा पुत्र मंदार याच्याशीं करून दिला मंदारानें स्वतंत्र आश्रम बांधून आनंदानें संसार चालविला होता एकदा त्याच्या आश्रमात भृशुंडी ऋषी आले त्याचें मोठें पोट, स्थूल देह आणि भुवयामधून निघालेली सोंड पाहून शमी आणि मंदार हसू लागलीं तेंव्हा भृशुंडींना राग आला 'तुम्ही मला विनाकारण हसलात, तेंव्हा तुम्हाला वृक्षयोनी प्राप्त होईल' असा त्याना शाप देऊन भृशुंडी तेथून निघून गेले मंदार वृक्ष झाला आणि शमीचेंहि झाड झालें

इकडे मंदाराचे गुरु शौनक आणि सासरा औरव याना शमी-मंदाराची काहींच वार्ता कळेना म्हणून ते त्याच्या शोधास निघाले शौनकांनीं भृशुंडीच्या शापाची गोष्ट ज्ञानदृष्टीनें ओळखली आणि गणेशाला प्रसन्न करण्यासाठीं तप केलें गजानन प्रसन्न झाले तेंव्हा शमी-मंदाराला पूर्व देह प्राप्त व्हावे अशी शौनकानें प्रार्थना केली तेंव्हा गजानन म्हणाले, 'भृशुंडीचा शाप खोटा होणार नाहीं पण आजपासून मी मंदार वृक्षाच्या मुळाशीं वास करीन आणि शमीपत्रें मला आवडतीं होतील'

गणेशाला प्रिय असलेल्या दूर्वेची कथा मुद्गल पुराणात सांगितलेली आहे ब्रह्मदेवानें चराचर सृष्टि निर्माण केल्यानंतर तिच्या खाण्यापिण्याची सोय काय करावी असा त्याला प्रश्न पडला मग ब्रह्मदेवानें गणेशाचें ध्यान केलें तेंव्हा

त्याच्या शरीरातून अनेक हातपाय, पुष्कळ तोंडें आणि खूप डोळे असलेली एक सुंदर देवी निर्माण झाली ही सर्वांचे पोषण करील असें ब्रह्मदेवाला ज्ञान झालें. 'तू तप कर आणि सर्वांचे अन्न हो तुला दूर्वा हें नाव मिळेल ' असा त्यानें तिला आशीर्वाद दिला पुढें दूर्वा देवीनें गणेशाला प्रसन्न करून घेतलें तेव्हां तिच्या मस्तकापासून षड्रसयुक्त स्वर्गान्न उत्पन्न झालें उदरापासून पृथ्वीवरच्या जीवासाठीं सुरस अन्न निर्माण झालें पाताळातील लोकासाठीं तिच्या पायापासून अन्न उत्पन्न झालें अशा तऱ्हेनें तिन्ही लोक पुष्ट झाले आणि ब्रह्मदेवाला आनंद झाला त्यानें तिला अन्नाची अधिपति केलें

काहीं कालानंतर दूर्वा देवीला आपल्या या ऐश्वर्याचा गर्व झाला ती पार्वतीशीं स्पर्धा करू लागली 'अन्नपूर्णा ती मीच आहें कारण मी अन्नस्वरूप आहें ही जगदंबा अन्नपूर्णा नव्हे' असें ती वारंवार उन्मत्तपणें म्हणू लागली पार्वतीला ही निंदा असह्य झाली 'तू पृथ्वीवर तृणरूप होऊन रहा' असा जगदंबेनें तिला शाप दिला मग तिचा गर्व उतरला तिनें पुन्हा तपश्चर्या केली आणि पार्वतीच्या शापापासून मुक्त करा अशी गणेशाची प्रार्थना केली गणेशानीं तिला सांगितलें कीं अंश रूपानं तू पृथ्वीवर तृण होऊन रहाशील तुझं मुख्य स्थान स्वर्गातच राहील पृथ्वीवर तू तृणरूप झालीस तरीहि तेथें शतमूला, शतांकुरा होऊन अमृतरूप धारण करशील तू सर्वमान्या, सर्वपूज्या आणि मंगलदायिनी होशील तुझें पत्र मला आवडेल '

मंदारवृक्षाच्या मुळीची गणेशमूर्ति करतात आणि हा मांदार गणेश भक्तांना लौकर प्रसन्न होतो अशी समजूत आहे मंदारवृक्षाची मुळी जमिनींत एकवीस वर्षे वाढली तर त्या मुळीची आपोआप गणेश-मूर्ति तयार होते अशी समजूत आहे वावेरीच भात म्हणून एक औषधी आहे डोंगर कपारींत ही वेल वाढते आणि त्याची मुळी ही उष्णतानाशक म्हणून घेतात ही मुळी एकवीस वर्षे वाढली तर तिचीहि गणेशमूर्ति तयार होते गणपतीला प्रिय असलेल्या त्या शमी, मांदार, आणि दुर्वा या वनस्पती आहेत त्या सर्वांचा मुख्य गुणधर्म उष्णतानाशक असाच आहे गणेशपुराणात अशी कथा आहे कीं, अनलासुराला गणेशानें गिळलें तेव्हां त्याच्या अंगाचा दाह होऊ लागला हा दाह दुसऱ्या कोणत्याहि उपायानें शमन होईना शेवटीं दुर्वांनीं तो दाह शांत झाला वनस्पतींच्या दाहशामक गुणांशीं खुद्द गणेशाचा संबंध अशा तऱ्हेनें जोडलेला आहे

वैद्य वा. वा. जोशी खानापूरकर यांच्या लेखांतून या वनस्पतींचे औषधी गुणधर्म उद्धृत करतो. दुर्वा या शीतवीर्या आहेत. दाह, उष्णता, पित्त यांच्या शमनासाठी दुर्वांचा उपयोग करतात. दुर्वेचा रस सेवन केल्या तर पित्तविकार, रक्तविकार, घावरे, तृष्णा, दाह, त्वचेचे रोग नाहींसे होतात. दुर्वेच्या रसानें मन भरून येतो. तसेंच ही जीवनी म्हणजे सप्त धातुवर्धक आहे. सांगलीकर पटवर्धनांचे पूर्वज आणि गणपति पुळ्याला त्यांनीं क्षेत्र म्हणून प्रसारांत आणलें ते हरभट पटवर्धन यांनीं येथें केवळ दुर्वेचा रस पिऊन तपश्चर्या करीत होते अशी आख्यायिका आहे. पेरें असलेल्या दुर्वेला गंड दुर्वा म्हणतात. ही लोहद्राविणी म्हणजे रक्त पाझरविणारी आहे. दुर्वांचा रस स्त्रियांना ऋतु प्राप्तीसाठीं देण्यास सांगितलेला आहे. दुर्वेच्या रसानें रक्तप्रवाह थांबतो म्हणून नाकातून किंवा त्वचेतून रक्त जात असल्यास दुर्वेच्या रसाचा उपयोग करतात. अतिसार, संग्रहणी, मूळव्याध, मूत्रकृच्छ, मूत्रदाह यांच्यावर दुर्वेचा उपयोग करतात.

शमीचा उपयोग कफ, कास आणि श्वास या रोगांवर करतात. शमीमध्यें रेचक गुण आहे ती पचण्यास हलकी, मूळ व्याधीवर उत्तम गुणकारी आणि त्वचारोग नाशक आहे. विष-प्रतिबंधक, आगपेणीवर व दंत-नख विषावर तिचा उपयोग करतात. मूत्ररोगावर शमी उपयुक्त असून धातुस्थानची कडकी यालविण्यास, प्रमेह, प्रदर, गर्मी या रोगांवरहि तिचा उपयोग करतात. मांदार हा सारक, वातनाशक, कुष्ठ, त्वचारोग, गुल्म, मूळव्याध, कफरोग, उदर या रोगांवर गुणकारी आहे. हृदयविकार, श्वास, कास यांच्यावर मांदाराचाहि उपयोग करतात. गर्मीच्या विकारावर मांदाराचा जादूसारखा उपयोग होतो म्हणून त्याला वनस्पतिजन्य पारा असें म्हणतात. याचीं पानें जाळून त्या सुकटीचें मलम अर्धांगावर उपयुक्त ठरतें.

गणेश सहस्रनामांत गणेश जे रोग बरे करतो असें म्हटलें आहे त्या रोगावर ऱ्या वनस्पतींचा उपयोग होतो.

विनायक हें गणशाचें एक लोकप्रिय नाव आहे विनायक म्हणजे विशेष नायक किंवा ज्याला नायकच नाहीं तो विनायक अशा दोन परस्पर विरुद्ध उपपत्त्या या नावावर बसविलेल्या आहेत या कल्पनाचा उल्लेख अन्यत्र आला आहे व्युत्पत्तीच्या आधारानें माडलेल्या या कल्पनाना ऐतिहासिक दृष्टीनें फाजील महत्त्व देता येणार नाहीं विनायक नावाचा पूर्वापार संबंध इतिहासानें सिद्ध होतो तोच मान्य केला पाहिजे हा संबंध विनायक-गणाशीं जुळतो

मानव-गृह्य सूत्र, बौधायन गृह्य सूत्र, याज्ञवल्क्य स्मृति या ग्रथातून विनायकाची माहिती आलेली आहे विनायक गण म्हटल्यानतर ते अनेक असणार हें उघडच आह याज्ञवल्क्य स्मृतींत या विनायक गणाचीं चार नावें दिलेलीं आहेत 'मितश्च संमितश्चैव तथा शालकटङ्कट । कूष्माण्डराजपुत्रश्च जपेत् स्वाहा समन्वितान् ॥ ' मित, संमित, शालकटङ्कट आणि कूष्माण्डराजपुत्र अशीं हीं चार नावें आहेत विनायक गणाची चार ही सख्याच सर्वमान्य आहे पण कित्येकानीं हे विनायक गण सहा मानले आहेत पण हीं सहा गणाचीं नावें वरच्या श्लोकांतील दोन नावें विभागून साधलेलीं आहेत शाल आणि कटकट, कुष्माड आणि राजपुत्र अशीं हीं नावें विभागून वाढविलीं अ हेत

हे विनायक गण शुद्ध सात्त्विक नाहींत ते विघ्नकारी, उपद्रवकारक, क्रूर असे आहेत ' डाकिन्यो यातुधानाश्च कूष्माण्डेऽर्भकग्रहा । भूत प्रेतपिशाचाश्च यक्षाश्चो विनायका ' अशी या विनायकांची गणना डाकिणी, यातुधान भूतप्रेत पिशाचाबरोबर भागवत पुराणानें केली आहे या विनायक गणाचा उपद्रव सुरू झाला म्हणजे नाना प्रकारच्या आपत्ती आणि क्लेश ओढवतात मनुष्य वेड्या प्रमाणें वागतो त्याला दुष्ट स्वप्नें पडतात, आपला कोणी तरी पाठलाग करतो आहे असं त्याला वाटू लागतें विनायक गणाची बाधा झाली म्हणजे राजपुत्राला राज्य मिळत नाहीं, उपवर वधूचे विवाह होत नाहींत, स्त्रियाना पुत्र प्राप्ती होत नाहीं, प्रत्येक व्यवहारांत अपयश येतें म्हणून या विनायक-गणाची शांति करावी असें सांगितलें आहे या शांतीचे अनेक विधि सांगितलेले आहेत हे शांति-विधि जादू टोण्याच्या स्वरूपाचे आहेत त्यावरून त्यांचें अथर्ववेदीय स्वरूप स्पष्ट होतें

विनायक गण प्रथम चार, सहा किंवा त्यापेक्षाहि अधिक सांगितले असले तरी पुढें एकाच विनायकाचा उल्लेख रूढ झाला. या एका विनायकाचा स्वभाव विनायक गणासारखाच होता. तेव्हा या ' विनायका 'ची विनायकगणाचा नेता म्हणून, प्रतिनिधी म्हणून उपासना आणि शांति केली जाऊं लागली. पण या विनायकाचा विघ्नांशीं संबंध असला तरी त्याचें स्वरूप विनायकगणाइतकें भयंकर नाहीं. त्याला विघ्नकारी म्हणण्याऐवजीं विघ्नाचा स्वामी, विघ्नपति म्हणूं लागले. विघ्ननाश व्हावा म्हणून त्याची पूजा प्रार्थना होऊं लागली. विनायकगण स्वत च विघ्नरूप होते, विनायक हा विघ्नेश्वर झाला.

या विनायकाचें वर्णन करताना त्याला ' हस्तिमुख ', ' वक्रतुंड ' ' गणेश्वर ' अशीं नावें दिलेलीं आहेत. या विनायकाबरोबर ' ज्येष्ठा ' नावाच्या देवतेचीहि पूजा मागितली आहे. ही देवी ' हस्तिमुखा ' आहे. या विनायक गणाचें आणि विनायकाचें हें स्वरूप लक्षात घेतल्यानंतर गजाननाशीं असलेला त्याचा पूर्वापार संबंध स्पष्ट होतोच. पण गणेशाच्या अवताराचीं जीं कारणें आणि जीं वर्णनें पुराणांतून दिलेलीं आहेत तीं पाहिल्यानंतर विनायक आणि गणेश यांचे पूर्वापर संबंध अधिक दृढ होतात मत्स्यपुराणात गणेशाला 'विनायक-पति' म्हटलेलें आहे. मनुष्याच्या कार्यांत विघ्न उत्पन्न व्हावींत यासाठींच ब्रह्मा, विष्णु आणि शिव यांनीं गणेश निर्माण केला असें अग्निपुराणात म्हटलें आहे. देवतांच्या यज्ञात विघ्नें उत्पन्न करणें हें गणेशाचें कार्य आहे असें ब्रह्मपुराणात सांगितलें आहे.

वराह पुराणातील कथा अशी आहे.—सज्जनांच्या कार्यांत विघ्नें येनात आणि दुष्टांचें कार्य निर्विघ्न पार पडतें याच्यावर काय उपाय करावा अशी चिंता एकदा देवांना आणि ऋषींना उत्पन्न झाली. पुष्कळ विचार करून ते रुद्राला शरण गेले. आणि दुष्कर्मांमध्यें विघ्नें येतील असें काहीं तरी करा अशी त्यांनीं महेश्वराची प्रार्थना केली हें ऐकून रुद्र प्रसन्न झाला आणि अनिमेष नेत्रांनीं तो उमेकडे टक लावून पाहूं लागला. या वेळीं रुद्राच्या मुखापासून आकाश अंशानें एक अत्यंत सुंदर आणि तेजस्वी कुमार निर्माण झाला. त्याच्या रूपानें आणि तेजानें देवांगना मोहित झाल्या. त्या कुमाराच्या ठिकाणीं महादेवाचे सर्व गुण होते आणि दुसरा रुद्रच की काय असा तो दिसत होता.

आला आणि त्यानें आपलें शरीर हातानीं घासलें त्याबरोबर शंकराच्या शरीरापासून हत्तीचें शिर असलेले, अनेक शिरांचे, नील रंगाचे, अनेक शस्त्रें धारण केलेले असे इतके विनायक गण उत्पन्न झाले कीं, सारी पृथ्वी क्षुब्ध होऊन गेली देवहि भ्याले इतक्यात ब्रह्मदेवानें आकाशातून देवाना सांगितलें, 'देव हो, तुमच्या कल्याणासाठींच शंकरानें हे विनायक उत्पन्न केले आहेत ' ब्रह्मदेवानं शंकराला म्हटलें कीं, आपल्या मुखापासून जो कुमार उत्पन्न झाला आहे त्याच्या अधिकारात हे सर्व विनायक गण रहातील, आपण या सर्वांना वर द्या तेव्हा शंकरानें आपल्या पुत्राला म्हटलें कीं, 'तुला भव-पुत्र, गजास्य, गणेश आणि विनायक असें म्हणतील. हे सर्व क्रूर दृष्टीचे प्रचंड विनायक तुझे सेवक होतील. यज्ञादि कार्यांत तुझी पूजा प्रथम होईल, अन्यथा तूं कार्यसिद्धींत विघ्नें आण ' गणेश आणि विनायक गण यांची ही जन्मकथा उद्बोधक आहे.

काशींत विश्वेश्वराच्या सभोंवार आठ आवरणात प्रत्येकीं आठ असे 'छप्पन्न विनायक' आहेत या सर्व विनायकांचा अधिष्ठाता 'ढुंढिराज' हा होय दुरासद राक्षसाचा वध करण्यासाठीं गणेशानं काशीमध्यें जो अवतार घेतला त्यालाच ढुंढिराज असें म्हणतात काशींतील विनायकांचीं नावं स्कंदपुराणांतर्गत काशी-खंडात दिलेलीं आहेत हीं विनायकांचीं नावें येथें उद्धृत केलीं पाहिजेत. कारण त्या नावावरून गणेशाचा आणि विनायकाचा संबंध स्पष्ट होतो, तसेंच विनायकांचें स्वरूपहि समजतें

हे विनायक असे —( १ ) अर्क, दुर्ग, भीमचण्ड, देहलीगणप, उद्दड, पाश-पाणि, सर्वहरण, सिद्धसिद्धि, ( २ ) लंबोदर, कूटदंत, शालकटंकट, कूष्माड, मुंड, विकट, राजपुत्र, प्रणव, ( ३ ) वक्रतुंड, एकदंत, त्रिमुख, पचास्य, हेरंब, विघ्नराज, वरद, मोदकप्रिय, ( ४ ) अभयद, सिंहतुंड, कुणिताक्ष, क्षिप्रप्रसादन, चिंतामणि, दन्तहस्त, पिचिंडिल, उद्दडमुड, ( ५ ) स्थूलदंत कलिप्रिय, चतुर्दंत, द्वितुंड, ज्येष्ठ, राज, काल, नागेश, ( ६ ) मणिकर्ण, आशा, सृष्टि, पक्ष, गजकर्ण, चित्रघंट, स्थूलजंघ, मंगल ( ७ ) मित्र, मोद, प्रमोद, यज्ञ, सुमुख, दुर्मुख, गणप, ज्ञान, ( ८ ) द्वार, अमुक्त, मोक्षद, भगीरथ, हरिश्चंद्र, कपर्दि, बिंदु, हे सर्व विनायक स्मरणानं सिद्धि देणारे आहेत

तपश्चर्या केली. त्यावेळीं शंकराच्या मुखापासून एक पुरुष उत्पन्न झाला. पांच मुखें, दहा हात, मस्तकावर चंद्र, गळयांत रुंडमाला, सर्पांचीं भूषणें सूर्याप्रमाणें तेज इत्यादि शंकराचीं संपूर्ण लक्षणें त्या पुरुषाच्या ठिकाणीं होतीं. तोच गणेश होता. आणि त्यानें शंकराला वर देऊन त्रिपुरासुराच्या वधाचें सामर्थ्य अर्पण केलें. याच संदर्भात गणेश-पुराणांतील दुसरी एक कथाहि लक्षणीय आहे. दुरासद राक्षसाच्या वधासाठीं गणेशानें वक्रतुंडाचा, ढुंढिराजाचा अवतार घेतला ही कथा पूर्वी सांगितलीच आहे. या दुरासदाला शंकरानें अमरत्वाचा वर दिलेला होता. त्या असुरानें जेव्हा सर्व देवांना त्रस्त केलें तेव्हां ते ब्रह्मदेवाला शरण गेले. ब्रह्मदेव त्या देवांना म्हणाले, 'या दैत्याला शंकरानें अनेक वर दिले आहेत. भलत्याच्या हातून त्याचा वध होणार नाहीं. शंकराचें सामर्थ्य अपार आहे. तोच जर पार्वतीच्या उदरीं अवतार धारण करील, तरच त्या दैत्याचा वध होईल.' मग देवांनीं पार्वतीची प्रार्थना केली. आणि पार्वतीच्या क्रोधांतून व नेत्रांतून जें तेज निघालें त्यात ढुंढीराजाचा अवतार झाला.

शंकराचीं वैशिष्ट्यें जशीं गणेशमूर्तीत आढळतात तशींच गणेशाचीं वैशिष्ट्यें शिवामध्ये दृग्गोचर होतात. गणेशाचीं वैशिष्ट्यें 'गजवदन, तीक्ष्णदंष्ट्र लंबोदर, महाकाय' या नांवांत आढळतात. अंधकासुराच्या वधासाठीं शंकरानें जें भैरव स्वरूप धारण केलें त्यावेळीं तो गज-वदन नसला तरी त्यानें गजचर्म पांघरलें होतें, त्याच्या दाढा तीक्ष्ण होत्या, आणि उदर विशाल होतें असें वर्णन सापडतें. अर्थात् हा संबंध जोडावा लागतो. पण शिवाचीं वैशिष्ट्यें गणेशाच्या ठिकाणीं ठळकपणें दिसतात. शंकराला गणेश्वर म्हणतात, त्याचीं त्रिशूल आणि डमरू हीं आयुध-भूषणें गणेशाच्याहि हातांत आहेत. अगदीं उघड दिसणारें शिव आणि गणेश यांच्यामधील हें साम्य पाहून गणेश हा शिव-सुत आहे असें आपलें समाधान सामान्य माणूस करून घेतो. 'आत्मा वै पुत्रः' या वचनाप्रमाणें पित्याचीं वैशिष्ट्यें पुत्राच्या ठिकाणीं आढळणें सहाजिकहि म्हणावें लागेल.

—

यांच्या शंकेचें निरसन करतांना अल्फ्रेड फौचर यानीं, पूर्वी गणेश आणि शिव या देवता एकरूपच मानीत असल्यामुळें शिवाला वंदन केल्यानंतर गणेशाचें वेगळें नमन करण्याची गरज महाभारतकाराला वाटली नसावी असा तर्क मांडला आहे. डॉ. संपूर्णानंद यांनी आपल्या 'गणेश' या ग्रंथांत शिव आणि गणेश यांच्यामधील आणखीं कांहीं समान वैशिष्ट्यें दाखविलीं आहेत; आणि शिव-गणेश हे एका काळीं अभिन्न असावेत असा तर्क मांडला आहे.

तैत्तिरीय आरण्यकांत रुद्रगायत्री आणि गणेश-गायत्री यांच्याशीं साम्य असलेला एक मंत्र आहे. तो मंत्र असा 'तत्पुरुषाय विद्महे वक्रतुंडाय धीमहि तन्नो दंतिः प्रचोदयात्' या मंत्रांतील 'तत्पुरुष' हें रुद्राचें नांव आहे तर वक्रतुंड आणि दंती हीं नांवें आज गणेशाचीं म्हणूनच ओळखलीं जातात. 'तत्पुरुषाय विद्महे महादेवाय धीमहि तन्नो रुद्रः प्रचोदयात्' हा रुद्र-गायत्रीचा मंत्र म्हणून प्रसिद्ध आहे. अथर्वशीर्षांत गणेश-गायत्रीचा मंत्र 'एकदंताय विद्महे वक्रतुंडाय धीमहि तन्नो दंतिः प्रचोदयात्' असा दिलेला आहे. तैत्तिरीय आरण्यकांतील मंत्रांत तत्पुरुषालाच वक्रतुंड आणि दन्ति या नांवांनीं संबोधलें आहे हें स्पष्ट दिसतें. 'तत्पुरुष' हें नांव गणेशाला कुठेंहि लावलेलें नाहीं ईशान्, सद्योजात, अघोर, वामदेव आणि तत्पुरुष हीं रुद्राचीं पांच नावें प्राचीन काळापासून प्रचलित आहेत. तेव्हा तैत्तिरीय आरण्यकाच्या काळांत तत्पुरुषाला वक्रतुंड आणि दंति असेहि म्हणत असत अथर्वशीर्षाची रचना झाली त्यावेळीं मात्र वक्रतुंड आणि दंति हीं नावें गणेशाला मिळालीं. म्हणजे तैत्तिरीय आरण्यकाच्या काळात तत्पुरुष आणि वक्रतुंड, दंति अभिन्न होते ते अथर्वशीर्षाच्या काळांत भिन्न समजले जाऊं लागले. इतकेंच नव्हे तर वक्रतुंड, दन्ति असा गणपति हा 'शिव-सुत' आहे असेंहि त्यावेळीं समजूं लागले.

रुद्र आणि गणेश यांच्या प्राक्कालिन अभिन्नत्वाचा एक पुरावा यजुर्वेदातहि आढळतो. हा पुरावा उंदरासंबंधींचा आहे. गणेश हा मूषकवाहन, आखुरथ, मूषकध्वज या नांवांनीं ओळखला जातो. या सर्वांचें तात्पर्य असें कीं, मूषक म्हणजे उंदीर हें गणेशाचें वाहन आहे. उंदीर हा गणेशाचा पशु आहे. पण यजुर्वेदातील मंत्र सांगतोः--'एषते रुद्रभागः सह स्वस्राम्बिकया तं जुषस्व स्वाहैषते रुद्रभाग आखुस्ते पशुः' 'हे रुद्रा, हा तुझा भाग आहे. आपली भगिनी

अंबिका हिच्यासह तो भाग तू ग्रहण कर उंदीर हा तुझा पशु आहे ' हा या मनाचा सरळ अर्थ आहे वेदामध्ये अंबिका ही रुद्राची बहिण आहे असेच अनेक ठिकाणी उल्लेख आहेत ही अंबिका रुद्राप्रमाणच क्रूर देवता आहे ज्वरा उत्पन्न करून ती शत्रूचा नाश करते असें तिचें वर्णन आढळतें यज्ञातील पुरोडाश रुद्र आणि अंबिका याना अर्पण करण्याच्या प्रसंगीं उपरिनिर्दिष्ट मंत्र म्हटलेला आहे उंदरानें खणून काढलेल्या मातीत पुरोडाशाचा भाग रुद्र आणि अंबिका याच्यासाठी ठेवला जात असे उंदीर हा तुझा पशु आहे ' असे या ठिकाणीं रुद्राला सांगितल आहे तत्पुरुष रुद्रापासून वक्रतुंड आणि दंती असा गणेश ज्यावेळीं भिन्न मानला जाऊ लागला त्यावेळीं हा आखु म्हणजे उंदीर रुद्रा ऐवजीं गणेशाचा पशु मानला जाऊ लागला असावा

शिव आणि गणेश या देवता एका कालीं अभिन्न मानल्या जात असाव्या असा तर्क इतरानीं मांडला तर तो सिद्धान्त म्हणून डॉ यदुवंशी यानीं आपल्या ' शैवमत' या ग्रंथात प्रतिपादन केला आहे डॉ यदुवंशी यानीं रुद्र आणि गणेश याच्या एकरूपतेचा एक टप्पा निश्चित केला आहे क्रूर देवता म्हणून विनायक गणाची पूजा होत असे त्या विनायकात रुद्राच्या क्रूर रूपाचाहि समावेश होता या रुद्ररूप विनायकाला हस्तिमुख कल्पिण्यात आलेला होता कालांतरानें रुद्राचीं अन्य रूपें विकसित झालीं आणि हस्तिमुख विनायकही रुद्रापासून भिन्न अशी देवता मानण्यात येऊ लागली शिव आणि गणेश याच्या अभिन्नत्वाचे काहीं पौराणिक दाखले गणेश पुराणातून मागें निर्दिष्ट केले आहेत इतर पुराणातहि असे दाखले सापडतात वराह पुराणात विनायकाला शिवानें उत्पन्न केलें आणि हा विनायक साक्षात् रुद्रच आहे असें सांगितल आहे

अग्निपुराणात गणेशाला ' त्रिपुरांतक ' म्हटलें आहे वायुपुराणात शिवाला ' गजेन्द्रकर्ण ', ' लंबोदर ' आणि ' दंष्ट्रिन ' अशीं विशेषणें दिलेलीं आहेत सौर पुराणात म्हटलें आहे कीं, गणेश हा वास्तविक शिव आहे शिव आणि गणेश याचें अभिन्नत्व दर्शविणारे जे उल्लेख पुराणात आढळतात त्यावरून खुद्द पुराणकाराना शिव आणि गणेश या देवता व्यावहारिक अर्थानें एकरूप आहेत असेंच वाटत होतें असा तर्क करणं धाडसाचें ठरेल आध्यात्मिक दृष्टीनें सर्व देवताचें ऐक्य प्रतिपादन करण्याची पुराणाची एक शैली आहे शिव आणि गणेश याचें पुराणानीं प्रतिपादन केलेलें ऐक्य या शैलीचें एक प्रत्यंतर

आहेच पण इतर देवतांपेक्षा त्यांनी गणशाचें शिवाशींच ऐक्य अधिक दाखविलें आहे हेंहि विसरता येत नाहीं आश्चर्याची गोष्ट अशी कीं, शिव-गणेशाचें हें ऐक्य गणशाच्या उपासनेत इतरत्रहि प्रगट झालेलें आहे लिंगपूजा ही केवळ शिवाचीच आहे पण गणेशाचीहि लिंग रूपानें पूजा होते या गणेश-लिंगाचा उल्लेख पुढें करावयाचा आहे त्यामुळें त्याचा येथें अधिक विस्तार करण्याचें कारण नाहीं लिंग पूजेप्रमाणेंच बीजमंत्रातहि हें ऐक्य आढळतें 'गम् गणपतये नम' यात ग हा गणेशाचा बीज मंत्र आहे गम् हाच शिवाचाहि बीजमंत्र आहे ग हेंच अग्नीचेंहि बीज आहे 'अग्निर्वै रुद्र' म्हणजे अग्नि आणि रुद्र हे अभिन्न आहेत तंत्रशास्त्रात गणेशाचें तेज हें तत्त्व मानलेलं आहे तंत्रशास्त्रात तेजाचें तत्त्व त्रिकोणानें दाखविलात गणेश-यंत्रात त्रिकोणामध्ये गणेशमूर्ति दाखवितात तात्पर्य, शिव, अग्नि आणि गणेश याचें हें अभिन्नत्व उपासना विधींतहि गृहीत धरलेलें आहे

शिव आणि गणेश याचें हें पूर्वकालीन ऐक्य वेदमंत्रात, पुराणकथात उपासना विधींत कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारे अवशिष्ट राहिलेलें आहे दक्षिण कानडात गणेश चतुर्थीचा सण हा दिवाळीच्या उत्साहानें साजरा होतो येथील गणेशपूजनात एक वैशिष्ट्यपूर्ण प्रकार आढळतो तो असा कीं गणशाच्या पूर्वी गणेशमूर्तीच्या आसनाखालीं शिवाची पूजा केली जाते गोमंतकात बारदेश भागात काहीं कुळामध्ये गणेश चतुर्थीच्या दिवशीं गणेशाची पूजाच करीत नाहींत त्या ऐवजीं शंकराची मूर्ति आणून तिचेंच पूजन केलें जातें या प्रथेचें अधिक संशोधन होणे आवश्यक आहे पण शिव आणि गणेश यांच्या विशेष संबंधावर ही प्रथा आधारलेली आहे याबद्दल शंका नाहीं



## १२ गणेशाचा शोध

श्रीगणेश हा बुद्धिदाता आहे त्यामुळेंच कीं काय गणेश देवता कशी उत्पन्न झाली, तिचा प्रसार कसा झाला हें शोधताना संशोधकांनीं आपल्या बुद्धि-चातुर्याची कमाल केली आहे गणेशाचा शोध घेताना संशोधकांचें कल्पना वैभव अगदीं फुलून येतें

गणेश ही मूळची अनार्य देवता याबद्दल बहुतेक पाश्चात्य संशोधक निःशंक असतात प्रो अल्फ्रेड फौचर यानीं ही कल्पना विशेष विस्तारानें मांडली आहे अनार्य लोक हत्तीची पूजा करीत, आणि त्या हत्ती पूजेंतूनच गणेशपूजन विकास पावलें असें त्याचें मत आहे त्याच्या मताप्रमाणें गणेश ही अनार्यांची एक ग्राम देवता इतर ग्रामदेवतांबरोबरच ती खेड्यात एकाद्या झाडाखालीं आसन घालून होती तर्थं अनार्य लोक त्याच्यापुढें नरबळी देऊन त्या रक्ताचा त्याच्यावर अभिषेकहि करीत असतील आणि त्यावेळीं जो रक्तरंग गणपतीवर चढला तो अजूनहि कायम आहे आजहि गणेशाला शेंदूर चर्चिलेला असतोच अशी ही अनार्यांची ग्रामदेवता वैदिक धर्मियाना आपली म्हणावी लागली

प्रथम गणेशाची शंकराच्या गणात गणना होऊ लागली शंकर हा भूतपति असल्यामुळें हें होण्यास फारशी अडचण आली नसेल या स्मशानवासी

महादेवाच्या गणाचा हा स्वतःच गण-पति झाला शिवगणाचें प्रमुख पद गणपतीला मिळाल्यावर त्याचे भक्त तेथेंच थांबले नाहींत त्यांनीं त्याला पुढें कार्तिकेयाचा भाऊच बनविलें पण या गजाननाला शिर पार्वतीचा पुत्र ठरविताना पुराणाची खूपच त्रेधा उडाली आहे कारण तेथें गजानें शिर त्याना नडू लागले मग तो पुत्र एकट्या शिवालाच मिळाला किंवा एका पार्वतीलाच प्राप्त झाला असें काहींतरी त्याना ठरवावें लागलें

अशा तऱ्हेनें शंकराच्या कुटुंबात कैलासावर गणपती स्थानापन्न झाल्यावर पुराणानीं त्याची भराभर बढती केली तो वाढता वाढता सर्वश्रेष्ठ देव झाला आणि त्यानें महेशालाहि मागें टाकलें

गणेश ही भारतातील प्राचीन देवता आहे गणेशाचे स्पष्ट उल्लेख अतिप्राचीन वाङ्मयात सापडत नसले किंवा पाचव्या शतकापूर्वीच्या त्याच्या मूर्ति सापडत नसल्या तरी त्याच्या या प्राचीनतेला बाध येत नाहीं असें फौचर याचें मत आहे भारतीय विचाराचा एका काळीं प्रभाव असलेल्या इंडोचीनमध्यें पांढरा हत्ती पवित्र मानला जातो भारतीय साहित्यात हत्तीचा अफाट गौरव केलेला आहे बुद्धचरित्रात हत्तीचें दर्शन अनेकदा घडतें पुराणात इंद्राचा ऐरावत आहे आणि पृथ्वीला आठ दिशानीं आधार देणारे अष्ट दिग्गज आहेत पण या हत्तींचा आणि गणेशाचा संबंध जोडता येत नाहीं याचा फौचर याला खेद वाटतो पण गणेशपूजनाचें मूळ हत्तीच्या पूजेत आहे ही कल्पना मात्र यामुळें त्याना त्याज्य वाटत नाहीं कारण गणेश ही मूळची अनार्य देवता असें त्याचें ठाम मत आहे

देवतानें मूळ निसर्गात आहे निरनिराळ्या ऋतुमानामुळें घडणारे बदल देवताच्या पूजेच्या मुळाशीं आहेत हा सिद्धांत बांधून त्याप्रमाणेंहि गणेशाचा शोध घेण्यात आला आहे रावबहादुर गुप्ते याना गणेश ही कृषिदेवता वाटते त्यानीं केलेलें गणेश-संशोधन मोठें विनोदीहि आहे !

गणेश ही शेतीची देवता आणि जमीन ही पार्वती माता भातशेती तयार होते त्यावेळींच गणेशचतुर्थी येते गणेशाचें वाहन उंदीर. उंदीर म्हणजे मूषक मूषक या संस्कृत शब्दाचा चोर असा अर्थ आहे आणि आपणहि उंदराला चोर समजतोंच शेताची नासाडी करणारा उंदरापेक्षा मोठा चोर कोण असणार !

गणपतीनें या उंदराचा पराभव करून त्याला आपलें वाहन करून ठेवलें हें या दृष्टीनें अर्थपूर्णच होय. शेतांतल्या उंदरांचा शत्रु साप; त्या सर्पाला गणपतीनें आपल्या कमरेभोंवतीं गुंडाळलें. पण या कृषिदेवतेला हत्तीची सोंड कुठून आली ? त्याचे ते शूर्पकर्ण, तो एकदंत यांची संगति काय ? शेत कापल्यानंतर धान्यासकट त्या कापलेल्या लोंब्यांचा शेतकऱ्यानें भारा बांधला आणि डोक्यावर घेतला; या लोंब्याच्या भाऱ्याला दोन बाजूंनीं, धान्य वाऱ्यावर देण्यासाठीं लागणारी सुपें अडकवलीं; आणि तसेंच नांगरहि घेतला. आणि असा हा लोंब्यांचा भारा घेऊन चालणारा शेतकरी थेट गणपतीसारखा दिसूं लागला ! नांगराचा फाळ हा त्याचा एकदंत आणि बाजूचीं सुपें हे शूर्प–कर्ण !

आणि गणपतीचें मोरया हें नांव कसें निर्माण झालें ? गणपती पोंचवतांना आपण 'गणपती बाप्पा मोरया । पुढच्या वर्षी लौकर या' असें म्हणतों. गणपतीला पोंचवतांना शेतकरी त्याला 'म्होरं या' सगळ्याच्या पुढें या असें म्हणतो. 'म्होरं' या शब्दाचें सुशिक्षितांनीं मोरेश्वर आणि पंडितांनीं मयूरेश्वर असें रूप बनविलें ! धान्याच्या लोंब्यांचा भारा घेतलेल्या शेतकऱ्यांतून गणपतीचें ध्यान तयार केल्यानंतर त्याचें नांवहि अशाच तऱ्हेनें निर्माण केलें पाहिजे !

गणेश देवतेचा कृषीशीं संबंध आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. गणपतीचें विसर्जन केल्यानंतर, ज्या जलाशयात मूर्तीचें विसर्जन केलेलें असतं त्या जलाशयांतील माती किंवा वाळू घरीं आणतात आणि घरात, विशेषतः धान्याच्या कोठींत फेकतात. धान्य समृद्धि व्हावी म्हणून हा विधि करतात. पण गणेशाचा कृषीशीं असलेला संबंध सिद्ध करण्यासाठीं त्याचें गजवदन भारा घेतलेल्या शेतकऱ्यांतून आणि त्याचें मोरया हें नाव 'म्होरं या' या शब्दांतून सिद्ध करणें हें अप्रयोजकपणाचेंच म्हटलें पाहिजे.

पुराणातील कथेत ढोबळ इतिहास जशाचा तसा सापडतो असा ग्रह पं. श्री. दा. सातवळेकर यांच्या संशोधनावरून होतो. पुराण ग्रंथ नवीन असले तरी त्यांतील कथा अति प्राचीन असतात असा त्यांचा विश्वास आहे. 'पूर्वी एकच ब्राह्मवर्ण होता,' असें महाभारतांत म्हटलें आहे. त्या काळांत कश्यपपुत्र विनायकाचा अवतार झाला. कश्यपपुत्र ब्राह्मण आणि देवांतक–नरातक हेहि ब्राह्मण असें पुराणांत म्हटलें आहे. म्हणूनच ही संगती सातवळेकरांना लावावी लागली असें दिसतें. सातवळेकर म्हणतातः—श्री शंकर हे भूतान देशाचे फार प्राचीन काळां-

तील प्रबल राजे होते भूत जातीच्या लोकांचें वसतिस्थान तें भूतान या भूतानमध्यें भूत नावाची जात अद्यापि आहे कैलास ही शंकराची राजधानी होती हिमालयाच्या उत्तर व पूर्व उतरणीवर असलेल्या व भूतानात रहात असलेल्या लोकांमध्यें मुखवटे घालून मिरविण्याची चाल आम्ही पाहिलेली आहे सध्या सणावाराच्या दिवशीं हे लोक निरनिराळे मुखवटे घालतात हे मुखवटे पशु, पक्षी व आकाळविकाळ प्राणी यांचे असतात आजच्या घटकेलाहि ही चाल हिमालय व भूतान या देशात आहे श्री गणेशाचें हेंच स्थान ही मुखवटे घालण्याची पद्धति फार प्राचीन असावी आपल्या अति प्राचीन इतिहासामध्यें, या चालीचा उल्लेख आहे तुरूचें घोड्याचें तोंड होतें, कोणाचें वानराचें होतें ह सर्व याच प्रदेशातील तुरू घोड्याच्या तोंडाचा मुखवटा घालून गात असेल त्याचप्रमाणें कोणी हत्तीच्या तोंडाचा व कोणी वाघाच्या तोंडाचा मुखवटा घालीत असलील '

गणेशाच्या गजवदनाची ही ऐतिहासिक उपपत्ति सभाय आहे इतर विद्वानानींहि हीच हत्तीच्या मुखवट्याची किंवा गज पूजेची कल्पना मांडलेली आढळते पण ही एकच उपपत्ति मुचवून सातवळेकर यांचें समाधान होत नाहीं गणेशाच्या इतर नावाची उपपत्तीहि याच धोरणानें ते लावतात इतकेंच नव्हे तर पूर्वी आपणच एक उपपत्ती सुचविल्यानंतर त्याच्याविरुद्ध दुसरी रूपरेषा मांडण्याचा मोहहि त्याना आवरत नाहीं त्रिविष्टप म्हणजे हल्लींचें तिबेट या ठिकाणीं देवाची वस्ती होती या देवावर होणारे राक्षसाचे हल्ले त्यानीं गणपतीच्या साह्यानें परतविले मग म्हणजे मोजलेले लोक श्रीशंकराच्या भूत राज्यातील लोकांची गणना करून अमुक जातीच अमुक लोक असे प्रथम गणपतीनें ठरविलें शंकराच्या शिलकी सैन्याचें सचालकत्व त्याच्याकडे असल्यामुळे त्याला उच्छिष्ट गणपति असें म्हणत, असेंहि सातवळेकरानीं सुचविलें आहे

गणेशाला, हत्तीचें रूपडें घालून मिरविण्याच्या भूत लोकातील पद्धतीमुळें गजवदन प्राप्त झालें असें सुचविल्यानंतर त्यापेक्षा अगदीं वेगळ्या अशाहि उपपत्ति सातवळेकराना सुचल्या आहेत गजानन आणि गजवदन या गणपतीच्या दोन नावाचा खुलासा म्हणून ते विचारतात —

'या शब्दावरूनहि हत्तीच्या गंडस्थळाप्रमाणें ज्याचीं गंडस्थळें आहेत, व डोळे बारीक असून नाक फार मोठें असें का समजू नये ?' समजायला काहींच

हरकत नाहीं पण हत्तीचा मुखवटा घालण्यासाठीं एखाद्या व्यक्तीला हत्तीप्रमाणे गंडस्थळें, बारीक डोळे आणि फार मोठें नाक असण्याची आवश्यकता काय? पार्वतीच्या पुत्रावर शंकरानें हत्तीचें शीर बसविलें या कथेचा उलगडा मुखवट्याच्या चालीनें होऊं शकतो तरीहि सातवळेकर दुसरं एक रूपक मांडतातच! ते म्हणतात —

'पार्वतीनें आपल्या अंगाच्या मळाची मूर्ती केली त्या मूर्तीचें शिर श्रीशंकरांनी कापलं व पार्वतीच्या विनंतीवरून हत्तीचें शिर त्या मूर्तीवर बसवून त्यास जिवंत केलें व आपला पुत्र मानला' ही शास्त्रीय गोष्ट आहे 'रज' हा स्त्रीच्या अंगचा मळ, त्याची पुनरावृत्ति मूर्ति जिवंत करण्यासाठीं पुरुष-वीर्यातील एक अणु, त्या स्त्री-रजाच्या मूर्तीवर बसवावा लागतोच, त्याशिवाय पुनरुत्पादनशील जिवंतपणा येतच नाहीं व हा पुरुष वीर्यातील अणु असा ~~~~ हत्तीचें तोंड व सोंड याप्रमाणेच असतो या शास्त्रीय सिद्धान्तावर रूपक करून ही गोष्ट रचलेली आहे' इतिहासाच्या क्षेत्रातून ही उडी एकदम गुप्तज्ञानाच्या शास्त्रात पडलेली दिसते एवढेंच याबद्दल म्हणता येईल।

प. सातवळेकर यांनी सुचविलेल्या हत्तीच्या मुखवट्याच्या कल्पनेशी सदृश अशी दुसरी एक कल्पनाहि उद्धृत करण्यासारखी आहे या कल्पनेप्रमाणें रुद्र आणि त्याची पत्नी गजचर्म परिधान करीत असत रुद्र आणि त्याचे विनायकादि गण ज्या अरण्यात वास करीत तें स्थान हत्तींविषयीं प्रसिद्ध असून हत्ती हा प्राणी विशेष बुद्धिमान समजला जाई म्हणून गणपति किंवा विनायक यास 'गजानन' हें अभिधान देण्यात आलें

हत्तीचे मुखवटे आणि गजचर्म याचा उल्लेख अशा ढोबळ पद्धतीनें न करता लोकनायक अणे यांनी जी पांडित्यपूर्ण आणि सूक्ष्म दृष्टीची उपपत्ती मांडली आहे ती ऐतिहासिक दृष्टीनें अधिक महत्त्वाची समजली पाहिजे गणपति अथर्वशीर्षांत गणेशाला 'व्रातपतये नमः' असं वंदन केलेलें आहे गृत्समदाचा विचार करताना मागें व्रातांच्या उल्लेख आलेला आहे मन-प्रधान आणि यज्ञ विरहित अशा अनार्य लोकांच्या संघाला आर्यांनी 'व्रत' हें नाव दिलें या 'व्रत' संघातील लोक ते 'व्रात' आर्य लोक आचाराला महत्त्व देणारे होते, तेव्हां आचारभ्रष्ट अशा स्वकीयांनाहि प्रथम प्रथम त्यांनी अधःपतित किंवा भ्रष्ट मानलें असेल तर त्यात काहीं आश्चर्य नाहीं यातून 'व्रात्य' निर्माण

झाले 'व्रात इव व्रात्य' अशी या शब्दाची व्युत्पत्ती आहे. व्रातावरून ते व्रात्य संस्कारहीन द्विजाला व्रात्य म्हणण्यात येत असे व्रात आणि व्रात्य यांच्यामध्ये उत्तरोत्तर फारसा फरक न राहणे सहज शक्य आहे व्रात हे वन्य श्वापदाची शिकार करून उपजीविका करीत शरीर कष्टानें होणाऱ्या उपजीविकेला 'व्रात' हा शब्द पाणिनीच्या काळीं उपयोजीत असत

गृत्सेभ्यो गृत्सपतिभ्यश्च वो नमो नमः।
व्रातेभ्यो व्रातपतिभ्यश्च वो नमो नमो।
गणेभ्यो गणपतिभ्यश्च वो नमो नमो।
विरूपेभ्यो विरूपेभ्यश्च वो नमो नमो।

या मंत्रातील गृत्स, व्रात, गण विरूप या शब्दांनीं लोकसमूहाचें वर्णन आलेलें आहे या चारहि शब्दाचा गणपति देवतेशीं निकट संबंध आहे गणपतीला कोठें कोठें गृत्समद असेंहि म्हटलें आहे प्रत-वैकल्यादि देह-दहन हा या लोकाचा धर्म होता हें व्रात शब्दावरून व्यक्त होतें गृत्स किंवा गृत्समद शब्दानें मेधावी आहे मद ज्याचा असा अर्थ होतो अर्थात् मदस्राव होणाऱ्या हत्तीला पूज्य मानणारे हे लोक होते 'विरूप' पदानें निरनिराळ्या प्राण्यांचीं रुपडीं घालून किंवा त्यांचीं सोंगें घेऊन हे लोक रहात असत असें दिसतें

शिवाच्या गजचर्मावरून एक गजोपासक अनार्य संघ शिवभक्तात होता असें दिसतें गज हें त्याचें चिन्ह होतें भृगुंगीच्या कथेवरून अनार्यांत गजानुयायी लोक होते आणि ते हत्तीचें रुपडें आपल्या तोंडावर घालीत असें दिसतें

या गजानुयायांशीं सेन नावाच्या दुसऱ्या संघाच्या कधीं कधीं लढाया होत व त्यामध्यें गजानुयायांचा पराभव सेन संघानीं केला असावा गणपति व कार्तिकेय सेनानी या उभयतांच युद्ध होऊन त्यात गणपतीचा एक दात पडला व तेंव्हापासून गणपतीला एकदंत असें नाव पडलें सेनानीं जेंव्हा गजभक्तांचा पराभव केला, तेंव्हापासून आपल्या शत्रूच्या निशाणावर स्वतःच्या विजयाची खूण म्हणून द्विरद गज काढण्याची मनाई केली असावी व पराभूत गजभक्तांनीं ती निमूटपण मान्य केली असावी सेन हा दलील अनार्य संघ होता

दिवसदिवस अनार्यांचा आर्य संस्कृतींत अधिकाधिक प्रवेश होऊं लागल्यावर, त्याना व्रात्य असें नाव देऊन आर्य संघाचे आश्रय मनविण्यात आले अशा या संयोग काळात गणपति या देवतेचें प्रस्तुत रूप तयार झालें

ॐ गणाना त्वा गणपतिं हवामहे
कविं कवीनामुपमश्रवस्तमम् ।
ज्येष्ठराज ब्रह्मणस्पत आन
शृण्वन्नूतिभि.सीदसादनम् ॥

गणेश ही देवता अवैदिक आहे, अनार्यांनी आहे, महाभारतात, इतकेंच नव्हे तर कालिदासाच्या काव्यनाटकातहि तिचा उल्लेख आढळत नाहीं, आणि त्यामुळें ही देवता इ स च्या नतर निर्माण झाली असावी अशा तऱ्हेचीं मतें पाश्चात्य विद्वानानीं प्रचलित केलीं आणि तीं सपूर्ण सत्य आहेत अशा अभिनिवेशानें आधुनिक आग्लविद्याधारी पडितानीं स्वीकारलीं हीं सुधारकाचीं मतें असून त्यामुळें आपल्या देवतेचें स्वरूप भ्रष्ट केलें जाते असें सनातनी लोकाना सहाजिकच वाटल आणि त्यानीं गणेश ही सपूर्णतया वैदिक देवता आहे असें मत आग्रहानें प्रतिपादन करण्यास सुरवात केली आधुनिक विद्वानानीं आपलीं मतें साधार माडलीं होतीं तथापि, त्याचे निष्कर्ष त्यामुळें पूर्ण सत्य ठरत नव्हते त्याचे निष्कर्ष हे अर्धसत्यें आहेत गणेश ही वैदिक देवता आहे असें ज्या सनातनी पडितानीं प्रतिपादन केलें त्यानीहि आपलें मत साधार माडलें आहे. पण त्याचा निष्कर्ष हा देखील अर्धसत्याच्या स्वरूपाचा आहे

गणेश ही वैदिक देवता आहे असें प्रतिपादन करणाऱ्याना परपरेचा भक्कम आधार आहे हें अर्थातच मान्य केल पाहिजे. गणेश देवतेचें वर्णन अथर्ववेदात असून ' गणपति अथर्वशीर्ष ' नावाचें सूक्तच आहे आजच्या पूज्य गणपतीचें संपूर्ण स्वरूप अथर्वशीर्ष सूक्तात दिलेलें आहे आणि त्या दृष्टीनें आजची गणेश ही देवता ' वैदिक ' आहे हें मान्य केल्च पाहिजे पण वेदवाङ्मयात अथर्ववेद हा अर्वाचीन आहे सर्वांत प्राचीन तो ऋग्वेद ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद हेच तीन वेद म्हणून मान्य असून अथर्ववेदाला वेद म्हणून नतर मान्यता मिळाली वेदवाङ्मयात अथर्व वेद हा उत्तरकालीन आणि म्हणूनच प्राचीनतेच्या दृष्टीनें गौण आहे, ही गोष्ट सनातनी पडितानाहि मान्य करावी लागते आणि त्यामुळें त्याना गणेशाचा शोध ऋग्वेदातच घेण भाग पडलें ब्रह्मणस्पति-सूक्तात त्याना हा गणपतीचा शोध लागला

ब्रह्मणस्पति-सूक्तातील गणेशाचा शोध हा परंपरेवर आधारलेला आहे कारण हे सूक्त परंपरेनें गणपतीच्या स्तवनासाठीं योजलें जातें ब्राह्मणस्पति-सूक्त हे सलग आणि स्वतंत्र असें ऋग्वेदातील सूक्त नाहीं ऋग्वेदातील पहिल्या, दुसऱ्या, सातव्या आणि दहाव्या मंडलातील कांहीं ऋचा एकत्र करून हें सूक्त तयार केलेलें आहे अर्थात् या ऋचा ऋग्वेदातील असल्या तरी त्या एकत्र करून त्याचा ब्रह्मणस्पति सूक्त म्हणून विनियोग करण्याचा उपक्रम हा मागाहून झालेला असला पाहिजे हें उघड आहे अथर्ववेदानंतर गणेश दवता लोकमान्य झाल्यानंतर त्या देवतेच्या स्तवनासाठीं हे ऋङ्मन्त्र ब्रह्मणस्पति-सूक्त म्हणून एकत्र करण्यात आले असले पाहिजेत असा तर्क करण्यास हरकत नाहीं

ब्रह्मणस्पति सूक्त हें आता परंपरेनें गणपतीचं सूक्तच मानण्यात येतें पण ही परंपरा असली तरी ती अगदींच निराधार आहे असें मात्र नाहीं हे संबंध सूक्त ब्रह्मणस्पति किंवा बृहस्पतीच्या स्तुतीच आहे बृहस्पती ही वेदातील एक देवता आहे बृहस्पती हा पुराणात तर देवाचा गुरु झाला आहे पण वेदातहि तो इंद्राचा साह्यकर्ताच आहे या बृहस्पतीच आयुध सुवर्णाचा परशु हें आहे अथर्व वेदातील गणपति लोकमान्य झाल्यानंतर हा वैदिक बृहस्पति किंवा ब्रह्मणस्पति हाहि त्याचा पूर्वावतार म्हणून मान्य झाला कारण या ब्रह्मणस्पतीच्या स्तुति स्तोत्रात त्याला 'गणपति' या नावानें किंवा विशेषणानें ऋग्वेद मंत्रातच आवाहन केलेलें होतें संबंध ब्रह्मणस्पति सूक्तात गणपति' हे नाव दोनदांच आलेलें आहे गणपति हे नाव असलेला गणानां त्वा' हा एक मंत्र मुखातील दिलेला आहेच दुसरा मंत्र असा - नि षु सीद गणपते गणेषु त्वामाहुर्विप्रतमं कवीनाम्। न ऋते त्वत्क्रियते किंचनारे महामर्कं मघवञ्चित्रमर्च ।।' 'गणपति' असें उल्लेख दोनच असले तरी तसे दोन तरी उल्लेख असल्यामुळे ऋग्वेदातील ब्रह्मणस्पति आणि अथर्ववेदातील गणपति याचं एकरूपत्व प्रतिपादन करणें आणि पटविणे फारसें कठीण गेलं नसावें शिवाय बृहस्पतीच्या हातात सुवर्ण परशु असला तरी गणपतीच्याहि हातात परशु होताच

गणपति शब्द असलेल्या उपरिनिर्दिष्ट दोन मंत्रात ब्रह्मणस्पतीची जी स्तुति केलेली आहे ती अथर्ववेदोक्त 'शिव सुताय वरद-मूर्तये' गणपतीला यथार्थपणें लागू होते गणानां त्वा' मंत्रात सांगितलें आहे कीं हे ब्रह्मणस्पते तू ब्रह्माचा

ज्येष्ठराज, कवींचा कवि, गणांचा गणपति आहेस. आम्ही केलेली ही स्तुति ऐकून तूं या यज्ञस्थळीं येऊन विराजमान हो. ' निषुसीद गणपते ' या मंत्राचाहि अर्थ तसाच आहे. हे गणांमधील गणपते, तूं ज्ञान्यांमध्यें श्रेष्ठ आहेस. तुझ्या पूजनस्मरणावांचून कोणतेंहि कार्य केलें जात नाहीं. ब्रह्मणस्पतीला गणांचा गणपति असें जें दोनदां म्हटलें आहे त्याचा अर्थ काय ? ब्रह्मणस्पतीला नुसतें ' गणपति ' असें नांव दिलेलें नाहीं, तर त्याला 'गणानां त्वा गणपतिं' असें म्हणून गणांचाहि उल्लेख केलेला आहे तेव्हां या ' गण ' शब्दाचा अर्थ काय ?

' गण ' शब्दाचा अर्थ करतांना बुद्धीचा स्वैर विलास आणि चमत्कार पहावयास सांपडतो. सायणाचार्यांनीं देवादि गणांचा गणपति असा अर्थ केलेला आहे असें डॉ. संपूर्णानंद सांगतात. भूतादि गणांचा पति हा अर्थ निदान ब्रह्मणस्पतीला तरी लागू पडणार नाहीं, असें वाटेल, पण श्री. य. रा. तळवलकर यांनीं ' पुरुषार्थ 'च्या गणेशांकांत लिहिलेल्या लेखांत हाच अर्थ विस्तारानें प्रतिपादन केलेला आहे. गणपति ही त्यांनीं ऋग्वेदीय देवता न मानतां अथर्ववेदीय देवताच मानलेली आहे. ते म्हणतातः–अथर्ववेदाच्या ब्रह्मवेद हें नांव आहे. अथर्ववेदीय पुरोहिताला ब्रह्मा हें नांव आहे. ' ब्रह्मन् ' नामक लोकजाति मूलतः अथर्ववेदीय आहे. ब्रह्मन् नामक संस्थेचा मुख्य तो ब्रह्मणस्पति. या संस्थेच्या आधिपत्याखालीं असणारांना ब्रह्मन् म्हणत. यांच्या लहान लहान टोळ्या असून त्या सर्वांवर मुख्य असणारा तो ' ज्येष्ठराज ' होई. या ब्रह्मणस्पतीला देव बृहस्पति म्हणत. या ब्रह्मन् लोकांचे अनुयायी भूत नांवाचे होते. त्यांचे संघ असत. आणि त्यांना ' गण ' म्हणत.

या सर्वांवर रुद्र नामक मुख्याधिकारी असे. रुद्रपत्नी ती रुद्राणी आहे. ही एक लढवय्यी जात असून ती ब्रह्मन्च्या तंत्रानें चालणारी असे. यांच्यामध्यें पुष्कळ जाति असून त्यांचीं वस्त्राभरणें, ध्वज भिन्न असत. यापैकीं एका टोळींत नायक नसल्यामुळें तिला विनायक म्हणत. एका युद्धप्रसंगीं त्यांतील एका गणानें शौर्य गाजविल्यामुळें त्याच्या गळ्यात नायकत्वाची माळ पडली. तोच विनायक उर्फ गणपति

गणेश पुराणांत गजाननाचा कृतयुगांतील अवतार म्हणून कश्यप आणि अदिती यांचा पुत्र महोत्कट विनायक याची कथा आलेली आहे. या कथेंत अंगदेशांतील रौद्रकेतूला देवांतक आणि नरांतक असे पुत्र होते; आणि त्यांचा

महोत्कट विनायकानें नाश केल्या अर्थ सांगितलेलें आहे. अंग देशांतील रौद्रकेतु हें नांव गणवाचक आहे. हा गण ब्रह्मन् जातीचा होता. देवांतक आणि नरांतक हे देव आणि नर या जातींचे अंतक. रौद्रकेतु गणाचें या देव आणि नर या दोन जातींशी वांकडें होतें. म्हणून त्या गणानें देव आणि नर यांना आहि मगवन् करून सोडलें. देवांना या अंग देशाचा कब्जा मिळाला नाहीं. म्हणून पुढील वैदिकांनीं अंग, वंग, कलिंग या देशात ब्राह्मणांनीं जाऊं नये असा निर्बंध घातला होता. या देव आणि नर जातींनीं कश्यप-पुत्र विनायकाची मदत घेतली व देवांतक नरांतक यांना नष्ट केलें. ही कृत युगांतील गोष्ट आहे. भगवत् गीतेच्या कालातहि देव आणि नर या लोकजाति विद्यमान नव्हत्या.

ब्रह्मन् या लोक जातीपैकीं रौद्रकेतु हा गण जरी देवाशीं शत्रुत्व करीत असे तरी ब्रह्मन् हे देवाना प्रतिकूल नव्हते. ब्रह्मणस्पति हा इंद्राबरोबर होता. सरमा आणि ब्रह्मणस्पतीप्रमाणें दध्यञ्च हाहि इंद्राचा सहाय्यक होता. दध्यञ्च हा अथर्वन् असून त्यानें आपल्या अस्थी इंद्राला वज्र करण्यासाठीं दिल्या होत्या. ब्रह्मणस्पति हें अथर्वणाचेंच नांव असावें. म्हणजे हे ब्रह्मन् पूर्वीपासून देवाबरोबर होते. यम, मनु आणि वैवस्वत यांच्या नेतृत्वाखालीं सर्व लोक उत्तर ध्रुवावरून आगें मागें परत फिरले आणि कश्यप ( म्हणजे कास्पियन ) समुद्राच्या आसपास येऊन राहिले. तेथें काहीं टोळ्या नृ आणि पितृ या नावानें ओळखल्या जाऊं लागल्या, पुढें या टोळ्यामध्यें शत्रु मित्रत्व निर्माण झालें. नर ही टोळी नेहमीं देवांमोंवतीं असे. पितृ हे नरापेक्षा श्रेष्ठ, पण देवांपेक्षा कनिष्ठ समजले जात.

ब्रह्मन् हे मनूबरोबर आले हे ब्रह्मन् स्वतःचें महत्त्व राखून अलगच रहात असत. त्यांनीं भूतमात्रें गोळा केलीं आणि या भुतांना अंकित करून आपला राज्यविस्तार केला. त्यामुळें ब्रह्मन् यांचा देवाना आणि नराना उपसर्ग पोंचूं लागला. देव आणि नर यांनीं पुढें ब्रह्मन् या लोकजातीबरोबर सख्य केलें. या सख्यत्वानंतर ब्रह्मन् यांच्या ताब्यात नसलेली देवांतक-नरांतक ही टोळी आणि देव, नर, विनायक, भूतगण यांची लढाई झाली. या लढाईत विनायकाच्या नेतृत्वाखालीं देव, नर, भूत यांनीं देवांतक-नरांतक ही टोळी खालसा केली. या सर्व जाति कश्यप समुद्राचा त्याग करून तिबेटातून हिमालयामधून मार्ग काढीत नेपाळ भूतान मधून आसाम बंगालमध्यें आल्या गणपतीला जें गजमुख आलें तें या लोकांना आसाममध्यें हत्तींचा शोध लागल्यानंतर. कृतयुगांतील

पहिला गणपतीचा अवतार जो रुद्रगणपुत्र विनायक त्याला गजमुख नव्हते. ब्रह्मणस्पतीचा शोध घेतांना असा हा वेदपूर्व आणि वेदकालीन घडामोडींना इतिहास म्हणून मांडण्यांत आलेला आहे.

'भारद्वाज' या टोपण नांवानें एका विद्वानानें पुरुषार्थाच्या गणेशांकांत ब्रह्मणस्पतीची आणखी चिकित्सा केलेली आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, वेदांतील देवता या सगुण असल्या तरी सरूप नाहींत. त्यामुळें ब्रह्मणस्पतीचें गणपतीशीं रूप साहश्य दाखवितां येणार नाहीं. अथर्वशीर्षांतील गणपति हा पूर्णपणें अवैदिक किंवा वेदातीत आहे. हा गणपति पौराणिक आहे. यज्ञक्रिया सूक्तांत गणपति पूजनाचा निर्देश नाहीं; इतकेंच नव्हे तर गीतेंत श्रीकृष्णानें अर्जुनाला जें विश्वरूप दाखविलें त्यामध्येंहि गणपति नाहीं.

गणपतीप्रीत्यर्थ ज्या वेदमंत्रांचा केवळ परंपरेनें विनियोग केला जातो त्यामुळें थोडीफार गफलत कशी होते तेंहि पहाण्यासारखें आहे. ऋग्वेदांतील आठव्या मंडलांतील काहीं ऋचांचा 'गणपति सूक्त' म्हणून गणेशाच्या स्तुतीसाठीं विनियोग केला जातो. या सूक्तांत बृहस्पतीचा, ब्रह्मणस्पतीचा उल्लेख नाहीं. गणपतीचाहि उल्लेख नाहीं. तें सूक्त इंद्राच्या स्तुतीचें आहे. मग त्याचा गणपतीसाठीं विनियोग का केला जावा? 'आ तू न इंद्र क्षुमन्तं चित्रं ग्राभं सं गृभाय। महाहस्ती दक्षिणेन' अशी त्या सूक्ताची सुरवात आहे. कदाचित् 'महाहस्ती' या शब्दानेंच या सूक्ताचा गणपतीशीं संबंध जोडला असावा! डॉ. संपूर्णानंदांनीं अशा गफलतीचें एक आगळीच विचित्र उदाहरण दिलें आहे. 'गणानां त्वा गणपतिं हवामहे प्रियाणां त्वा प्रियपतिं हवामहे निधीनां त्वा निधिपतिं हवामहे वसो मम। आहमजानि गर्भधमात्वमजासि गर्भधम्।' हा शुक्ल यजुर्वेदातील मंत्र आहे आणि तो गणेश स्तुतीसाठीं म्हटला जातो. पण हा मंत्र अश्वमेध प्रसंगीं यजमान पत्नीनें म्हणजे राजपत्नीनें यज्ञीय अश्वाला उद्देशून म्हणावयाचा आहे. त्या वेळचा विधि तर अश्लीलच आहे. पण मंत्रांत 'गणपति' हा शब्द आल्यामुळें अर्थाचा विचार न करतांच तो गणपतीला उद्देशून कांहीं लोक म्हणूं लागले! अर्थात् ब्रह्मणस्पति-सूक्ताबाबत असा घोटाळा नाहीं.

ब्रह्मणस्पतीबद्दल 'भारद्वाज' यांचें मत असें आहे:-इंद्राचें व बृहस्पतीचें यांत अन्याय अंगीं धारणें आहे. गाई सोडवणें, पाणी फोडणें, स्तवन-पर्याप्त

सतति-सपत्ती देणें, त्याच्या शत्रूना मारणें हींच कार्ये इंद्र आणि बृहस्पति दोघेहि करतात बृहस्पतीची स्तुति करून त्याला काय सांगितलं आहे ? 'हे ब्रह्मणस्पते तू वाग्देवीसह ये ' 'तू इंद्रादी देवांकरता स्तोत्रें रचून दे ' तू देवांच्या निंदकांना ठार कर ' 'तुझा पराक्रम स्पष्ट दिसत असताहि तुला कोणी मानीत नाहीं ' 'तू यज्ञकर्त्या यजमानाचें ऋण घेणारा व फेडणारा आहेस ' अथर्ववेद त्याचसा व्यावहारिकहि आहे स्थलदृष्ट्या तो ब्रह्मदेशाकडे झुकतो भृगु, अंगिरा, बृहस्पति हे ब्रह्मदेशीय होत या नर्मन लोकांच्या अनुवायात भूतगण असत त्यांना गण म्हणत त्यांचा पति तो गणपति बृहस्पति आणि गणपति हे देवेतर समुदायापैकीं भिन्न भिन्न व्यक्ति विशेष होते त्यांचा पक्ष एक होता पण ती व्यक्ति एकच नव्हती ब्रह्मदेशात ब्राह्मण ही एक आर्येतर जमात होती देवांबरोबर या ब्राह्मणाचा प्राचीन वाङ्मयांत स्वतंत्र निर्देश आहे यानीं आर्य असुरापासून होणारा त्रास नाहींसा करण्यासाठीं सुरांबरोबर, देवांबरोबर सख्य केलं वैदिक यज्ञाच्या द्वारा सुरू झालेल्या या सहकार्यांत ब्राह्मणांनीं इंद्रादि आर्य देवतांचे स्तुति मंत्र तयार केले बृहस्पति हा ब्रह्मदेशीय प्रमुख ब्राह्मण होता अति प्राचीन कालाचा हा 'इतिहास' कथन करताना तर्काचा, आणि त्यापेक्षाहि कल्पनेचा आधार घेणं या लेखकांना अपरिहार्यच होतें त्यामुळें यात मतभेदाला विस्तृत क्षेत्र उपलब्ध होणेंहि सहाजिकच आहे

ब्रह्मणस्पतीचें निमित्त करून अतिप्राचीन इतिहासाच्या अज्ञात प्रदेशात भरारी मारण्याएवजीं थोड्या वेगळ्या पद्धतीनें ब्रह्मणस्पतीला मिळालेल्या 'गणपति' या विशेषणाचें स्पष्टिकरण लोकनायक अणे यानीं एका लेखात केलें आहे ते म्हणतात, 'निघंटूत गण शब्द वाणीवाचक शब्दगणात घातला आहे तेव्हा 'गण' हा शब्द मनुष्यवाचक नसून वाणीवाचक आहे हें उघड दिसतें वेदांतील शब्दाच निरनिराळ्या दृष्टींनीं वर्गीकरण करण्याचा क्रम सुरू झाला व या प्रत्येक शब्दसमूहास गण अशी संज्ञा होती यास्काचार्यांचा निघंटु हा नुसता गणसंग्रह आहे व त्याच्या पूर्वी इतर आचार्यांनीं असा उपक्रम केल्याचे निरुक्त व निघंटु या दोन्ही ग्रंथांवरून दिसून येतें वेदांतील अवघड शब्दांचे कोश रचण्याचा काल सुरू झाला तेव्हा हे गण अस्तित्वात आले शब्दगण नीट आल्याशिवाय वेदार्थ होणें कठीणच असल्यामुळें त्यांचे अध्ययन वेदकालीं सुरू होतें व अशा तऱ्हेचे गण रचणारा पुरुष हा त्या कालीं मोठा

बुद्धिमान् आणि विद्वान समजला जात असे म्हणूनच बृहस्पतीला गणपति हें विशेषण दिलें आहे शब्दाचे वर्ग व वर्गीकरण करणारे ऋषी या उभयतांना 'गण' ही संज्ञा होती हें 'गणाद् गण ' या निरुक्त वचनावरून सिद्ध होतें

कै महादेव मोरेश्वर कुंटे यानीं बृहस्पती आणि गणपति याचा संबंध अशाच तऱ्हेनें जोडलेला आहे ते म्हणतात, 'तत्त्वज्ञान विचाराच्या सुरवातीच्या काळातच लिहिण्याच्या कलेचा उपयोग केला जात होता वर्गीकरणाच्या एकाच सर्व साधारण नियमांत बसणाऱ्या किंवा एकाच अर्थाच्या वाचक असलेल्या शब्दांच्या टिपण्या किंवा तालिका प्रथम सिद्ध करण्यात आल्या यानाच 'गण' म्हणत गणपति हें बृहस्पतीचें नाव होतें यालाच हळू हळू मूर्तिमंत ज्ञान समजू लागले हेंच साक्षात् ब्रह्म आणि प्रत्यक्ष वेदहि तेंच '

ब्रह्मणस्पतीबद्दलच्या वरील निरनिराळ्या उपपत्तींचा साकल्यानें विचार केला तर ब्रह्मणस्पति आणि गणपति याचा संबंध मान्य करावा लागतो 'गणपति हा प्रथम ब्रह्मणस्पति होता आणि पुराण कालाच्या सुमारास तो विलक्षण स्वरुपाचा गणेश देव झाला' हें म्हणणें अर्थातच स्वीकारता येण्यासारखें नाहीं इतिहासाच्या ओघात अनेक जमातींच्या देवतांचें एकीकरण होत होत अथर्वशीर्षोक्त गणपति देवता सिद्ध झाली त्या देवतेंत वैदिक ब्रह्मणस्पतीचाहि अंश बेमालूमपणें मिसळण्यात आला वेदकालीं ब्रह्मणस्पतीला 'गणपति' म्हणत असत त्यानंतर वैदिकानीं त्या आधारे गणपतीला ब्रह्मणस्पती म्हटलें आणि गणेश देवतेचा वैदिक परंपरेशीं साधा जुळा गेला तामिळनाडमध्यें गणपतीला आजहि ब्रह्मणस्पती असें नाव प्रचलित आहे इतकी ही परंपरा दृढ आहे



## १४ आध्यात्मिक गणेश

गणेश ही मूलतः अनार्य देवता नसून ती वैदिक देवता ब्रह्मणस्पतीच आहे असा दावा मांडणारे पंडित निदान देवतेकडे पहाण्याची, किंवा तिचें स्वरूप शोधण्याची ऐतिहासिक दृष्टि तरी मान्य करतात असें म्हणलें पाहिजे. पण देवतेच्या स्वरूप-शोधनात ऐतिहासिक दृष्टि संपूर्णतया वर्ज्य मानावी असेंहि प्रतिपादन करणारे कांहीं विद्वान आहेत. देवतेचा संबंध कोणत्याही प्रकारे आर्येतरांशीं जोडणें हें त्यांना 'अब्रह्मण्यम्' वाटतें. देवतेचें स्वरूप केवळ अध्यात्मिक कल्पनांतच शोधलें पाहिजे असा त्यांचा अट्टाहास असतो. अंतरीक्षातील तेजोगोलांशीं देवतेचा संबंध जोडण्याची कल्पना ही कांहीं अशीं ऐतिहासिक दृष्टीलाहि मान्य होण्यासारखी आहे. पण ऐतिहासिक दृष्टि सर्वथा त्याज्य मानणाऱ्या विद्वानांनाहि हा तेजोगोलाशीं जोडलेला देवतांचा संबंध मानवतो. याचें कारण या कल्पनेमुळें देवतांचा आर्येतर मानवांशीं संबंध टळतो हेंच असावें. देवतांवर अध्यात्मिक रूपकेंच बसवावीं असा अट्टाहास 'गणेश' या पुस्तकात डॉ. स. कृ. फडके यांनीं विशेष केला आहे.

आकाशांतील राशी-नक्षत्रांवरून देवतांची कल्पना निर्माण झाली असें ज्योतिर्विदांचें संशोधन आहे. आकाशांत चमकणाऱ्या तेजोगोलांच्या चमत्कारांकडे मनुष्य नेहमींच आश्चर्यचकित होऊन पहात आला आहे. भारतीयांचा लिखित इतिहास नाहीं. पण आमच्या पूर्वजांनीं आपला इतिहास आकाशांत लिहून ठेवला आहे; तो कोणीहि वाचावा, असें यावर सांगितलें जातें. सप्तर्षि आकाशांत जाऊन बसले; ध्रुवानें अढळपद मिळविलें, मृगरूपानें पळणाऱ्या ब्रह्मदेवाचा पाठलाग व्याधरूपी शिवानें केला तें मृग नक्षत्र आणि व्याधाची चांदणी तेथें आहे. त्रिशंकूहि तेथें चिरंजीव झाला आहे. मग गणेशाचेंच दर्शन आकाशांत कां होऊं नये?

आकाशांत तसें गणेश-दर्शन झालें आहे. भाद्रपद महिन्यांत वृषभ, मिथुन, कर्क, सिंह आणि कन्या या पांच राशींतच सूर्य कुठें तरी असतो. भाद्रपदांत उदित असलेल्या या राशींत वृषभ रूपानें शंकरवाहन नंदी बसला आहे. त्याच्यापुढें मिथुनरूपी स्त्रीपुरुष म्हणजे उमा-महेश्वर, त्यांच्या पुढें अनेक हात, सोंड आणि दांत यांनीं मंडित असलेला गणेश खेंकड्यासारखा दिसतो, तीच कर्क; त्यानंतर कन्या. हिला सरस्वती म्हणा किंवा दुर्गा म्हणा. सरस्वती म्हटली तर गणपतीच्या शेजारीं आहे. दुर्गा म्हटली तर तिच्याच पुढें देवीवाहन सिंह आहे. पण हें एवढेंच आकाशस्थ गणेशाचें दर्शन आहे असें नाहीं.

नेपाळात सूर्य-गणपती आहे. पण गणेशदेवता सूर्योपासनेंतून आली अशीहि कल्पना आहे. द्रविड लोक सूर्योपासक होते त्यांनीं गणेश हा सूर्य मानला. सूर्य रात्रीवर, अंधकारावर आक्रमण करतो. दक्षिणेंत उंदीर हें रात्रीचें प्रतीक मानतात. त्यामुळें मूषकावर आरूढ होणारा गणपति आपोआपच सिद्ध झाला. ही झाली एक कल्पना. दुसरी कल्पना अशी कीं, मृगनक्षत्र हा आकाशांतील गजासुर होय. मृग याचा एक अर्थ हरिण आणि दुसरा अर्थ हत्ती. या मृग नक्षत्राच्या मार्गे व्याध तारा तो शिव या शिवानें गजासुरावर त्रिशूळ मारला. त्याच्या खुणा म्हणजे मृग नक्षत्राच्या पोटांत दिसणारे तीन तारे. हें मृगशीर्ष उत्तराभिमुख आहे. त्याचा स्वामी चंद्र आहे.

सूर्य या मृगनक्षत्रावरून उत्तरेकडे जातो त्यावेळीं गजासुराचें शीरच तुटल्या-सारखें होतें. पुढें चंद्र हस्तनक्षत्रीं आल्यावर तेंच हस्तिशिर गणेशचंद्रावर दिसूं

घन आणि गोल जमिनीतच निरंतर रहाणाऱ्या उंदराला हा धनाग्नि प्राण अधिक अनुकूल असावा म्हणून उंदीर हें गणपतीचें वाहन

गृत्समदाच्या पौराणिक कथेवर रचलेलें रूपक असें आहे कीं मुकुंदा ही कामिनी स्त्री नसून एखाद्या पारमार्थिक सिद्धीचें स्वरूप असावी म्हणूनच तिचा अव्हेर केल्यामुळे रुक्मांगदाला कोड फुटलें चोर होईल हा शाप शाब्दिक कोटी आहे चोरी म्हणजे तळहातावरील रेषाप्रमाणें जिला मदन दर्शन झालें आहे ती रुक्मांगदाला गुप्त झालें म्हणजे कोड फुटलें याचाहि अर्थ वेगळाच आहे शिपिविष्ट या संस्कृत शब्दाचा उत्तान अर्थ कुष्ठी आणि गूढ अर्थ विष्णु शिव असा आहे

गणपतीच्या नांवावर अध्यात्मिक अर्थ लावण्याचा निकष मुद्गल पुराणात केलेला आहे पण तो निकष अपुरा वाटतोच कीं काय तसे नवे प्रयत्न चालू आहेतच मयूर म्हणजे माया म्हणून मोरेश्वर हा मायेचा स्वामी अर्थात् ब्रह्म एकदंत म्हणजे काय? तर एक शब्दात्मिका माया, दन्त सत्ताधर ' तात्पर्य, पुन्हा तोच अर्थ म्हणजे ब्रह्म गणपति ही बुद्धीची देवता तिचा उंदराशीं संबंध काय असावा? त्यासंबंधीचा तर्क असा कीं उंदीर हा कुरतडणारा जी वस्तु पुढें असेल तिच्या भागाभागाचें विश्लेषण करणे हें उंदराचं कार्य दिसतें। ह्या कार्यावरून उंदीर हा मीमांसा-सुलभ विश्लेषणकारी बुद्धीचा प्रतिनिधि वाटतो

गणेशाला ॐकार स्वरूप मानून खुद्द गणेशगीतेंत त्याच्यावर रूपक केलें आहे ॐकार म्हणजे प्रणव प्रणवापासून सर्व विश्वाचीच उत्पत्ती मानलेली आहे गणेशाच्या ॐकारावतारावी एक कथा हि आहे ती अशी कीं, एकदा शंकर पार्वती चिन्तालग्नित प्रणवावर एकाग्रमनानें दृष्टि लावून पहात होते अकस्मात् त्या ॐकारातून साक्षात् गजाननाची मूर्ति प्रगट झालेली पाहून शिवपार्वती प्रसन्न झाले

गणेश देवतेवर आध्यात्मिक रूपकें बसविणें अयोग्य आहे असें म्हणता येणार नाहीं उपासकाला आपल्या उपासनेंत अशा रूपकानें साह्यहि होत असेल पण अशीं आध्यात्मिक रूपकें मांडताना अतिरेक करून पौराणिक कथांवरहि तीं रूपकें लादण्यात इतिहास अमान्य करून पुराण-कथा आणि देवता या काल्पनिकच आहेत अशी आपण अप्रत्यक्षपणे कबुली देतों याचें भान या विद्वानांना रहात नाहीं!

पुराणांतील कथा आणि पंडितांचे संशोधनात्मक सिद्धान्त किंवा तर्क यांच्या मधून गणेश चरित्राचें विविध दर्शन आतापर्यंत घेतलें. या दर्शनांतून ऐतिहासिक दृष्ट्या गणेश देवता कशी सिद्ध झाली हें आता निश्चित करावयाचें आहे. गणेश देवतेसंबंधीं ती आर्य देवता कीं अनार्य देवता, वैदिक कीं अवैदिक या संबंधींचे पण्डितांचे सिद्धान्त परस्पर विरोधी असले तरी ते साधार आहेत. म्हणूनच यांपैकीं कोणताहि एकच सिद्धान्त ग्राह्य मानणें कठीण आहे. अगा मार्गानें हे सारे सिद्धान्त ग्राह्य मानले पाहिजेत. हे सिद्धान्त त्यांच्या एकांतिक स्वरूपात जरी परस्पर विरोधी भासत असले तरी भारतीय संस्कृतीच्या स्वरूपाकडे पाहिलें तर ते परस्पर पूरक आहेत असेंच दिसून येईल. इतकेंच न हे तर भारतीय संस्कृतीची घडण या गणेश देवतेच्या स्वरूपात प्रतिबिंबीत झालेली दिसते आणि मंगलमूर्ति श्री गणेश हें भारतीय संस्कृतीचें प्रतीक आहे असेंच आपल्याला म्हणावें लागेल.

भारतीय संस्कृति ही गंगेप्रमाणें आहे. गंगेचा ओघ अनंतकाल अखंड वहात आहे. त्याचप्रमाणें या भारतीय संस्कृतीचा ओघ अनंतकाल अखंडपणें वहात आलेला आपल्याला दिसतो. इतिहासकालात दृष्टि जितकी म्हणून माग फेंकता येईल तेथपासून या संस्कृतीचा ओघ वहात असलेला आपल्याला दिसतो. त्याच्याहि पलिकडून हा ओघ वहात आलेलाच आहे. पण त्याच्या मुळाशीं आपली दृष्टि पोंचत नाहीं. ही संस्कृती अति प्राचीन आहे, त्याचप्रमाणें ती अखंड आहे. ती अखंड आहे हाच तिच्या जिवंतपणाचा सर्वांत मोठा पुरावा आहे. सर्वांत प्राचीन म्हणजे वेद असें आपण समजतो. वेदकालाचा निर्विवाद किंवा सर्वमान्य असा निर्णय जरी कदाचित् झाला नाहीं तरी तो काल सहस्रावधी वर्षां मागचा आहे ही गोष्ट निर्विवादच आहे. आणि वेदकाल कोणताहि तरी मर्यादेला निश्चित केला आणि त्यापूर्वींहि अन्य संस्कृति येथें होत्या असा काहीं विद्वानांचा सिद्धान्त मान्य केला तरी त्यामुळें भारतीय संस्कृतीचा ओघ खंडित होत नाहीं. कारण भारतीय संस्कृतीनें वैदिक संस्कृती पूर्वींच्या आणि त्यानंतरच्या विविध संस्कृतींना आणि समाजांना स्वतः मध्यें सामावून घेतलेलें आहे.

भारतीय संस्कृतीची गंगा कुठून उगम पावली हें स्थलकाल दृष्ट्या जरी निश्चित करता आलें नाहीं तरी तिचा दृश्यमान होणारा प्रवाह अखंड आहे या गंगेचा उगम म्हणजे गंगोत्री अदृश्य आहे एवढेंच म्हणावें लागेल आणि गंगा नदीबद्दलहि अशाच कल्पना आहे ती स्वर्गांतील गंगा शंकराच्या जटेतून किंवा विष्णूच्या पादांगुष्ठापासून निघाली असेंच पुराणें सांगतात पण गंगा नदी गंगोत्रीपासून जशी निघाली तशीच ती सागराला मिळालेली नाहीं तिचा मूळ प्रवाह निघाल्या नंतर शेंकडों प्रवाह तिला येऊन मिळाले आणि त्या सर्वांना तिनें आत्मसात केलें हे बाकीचे शंकरो प्रवाह कमले आहेत याचा चिंता कोणी केली नाहीं 'गंगेसी मिळतां गंगाजल' असेंच त्या-त्यांनदलहि मानलें आणि तें सर्व गंगाजल पवित्र ठरलें हे जे शेंकडों प्रवाह गंगेला मिळाले ते कोणी प्रयत्न केला तरी त्यांना गंगेपासून वेगळे काढतां येणार नाहींत अशाच गंगोत्रीपासून निघालेली भारतीय संस्कृतीची गंगा वर्तमान कालसागराला मिळेपर्यंत अखंड वहात आली याचें कारण तिनें काल प्रवाहात शेंकडों लोकजातींच्या संस्कृतींचे प्रवाह आत्मसात केले हें आहे आज या भारतीय संस्कृतीच्या प्रवाहांतून हे भिन्न भिन्न प्रवाह वेगळे काढून दाखविणें अशक्यप्राय झालें आहे भिन्न भिन्न संस्कृतीचे प्रवाह येथें इतके एकरूप झालेले आहेत

वैदिक संस्कृतीचे अभिमानी विद्वान गणेश ही वैदिक देवता आहे असे म्हणून 'गणानात्वा'सारखे प्राचीन मंत्र दाखवितात आणि ब्रह्मणस्पतीची परंपरा सांगतात त्यांची ती परंपरा संपूर्णतया अमान्य करण्याचे कारण नाही आणि पूर्णपणे मान्यहि करता येणार नाही हें आपण ब्रह्मणस्पती संबंधींच्या विवेचनात पाहिले आहे पण वैदिक संस्कृतीशिवाय अन्य भारतीय अशा संस्कृती हीन असून त्यांचा स्पर्श गणेशाला होता कामा नये आणि तसा स्पर्श होतो म्हणून ऐतिहासिक दृष्टीच त्याग मानणारी ही त्यांची सोवळेपणाची भूमिका केवळ मिथ्याभिमानाची आहे शिवाय भारतीय संस्कृतीच्या सम्यक् स्वरूपासंबंधीचे अज्ञानहि या भूमिकेत आहे गणेश ही केवळ वैदिक देवता ठरली तरच ती शुद्ध ठरते असे म्हणणे हा विनाकारण प्रायश्चित्त देऊन सोवळा करण्याचा प्रकार आहे! वैदिक अभिमान्यांनी अशी भूमिका घेणे हा मुद्दा भारतीय संस्कृतीच्या प्राचीन पण संमिश्र स्वरूपाचाच एक परिणाम समजला पाहिजे!!

गणेश देवतेचे सर्व स्वरूप हे अथर्वशीर्षाच्या रचनेच्याकाळीं निश्चित झाले त्यानंतर पुराणांनी त्याच्या स्वरूपात काहीं भर घातली असेल पण ती विचारात घेतली नाहीं तरी चालेल 'एकदंताय विद्महे वक्रतुंडाय धीमहि। तन्नो दंती प्रचोदयात् ॥ ८ ॥ एकदंत चतुर्हस्तं पाशमंकुशधारिणम्। रदंच वरदं हस्तैर्बिभ्राणं मूषकध्वजम्॥' हे जे गणेशाचें ध्यान अथर्वशीर्षानें निश्चित केलें तें आज आसेतु हिमाचल सर्व हिंदूंना मान्य आणि पूज्य असे ठरलेलें आहे अथर्वशीर्षाच्या काळापासून आजवर हें गणेश स्वरूप कमी अधिक प्रमाणात भारतभर आणि भारताबाहेरहि पूजनीय झाले याबद्दल कोणाचाच वाद नाहीं सहा या शतकाच्या प्रारंभापासूनच गणेश मूर्ती आढळतात आणि महाभारतानें किंवा कालिदासानें गजानन गणेशाचा उल्लेख करून त्याचें नमन केलें नाहीं असल्या आधारावर गणेशाचा काळ इ स च्या पाचव्या किंवा पाचव्या शतकात ओढू पहाणाऱ्यांना, अलेक्झेंडर पौवर यांनी त्यांच्या पुस्तकी विद्यानीच उत्तर दिले आहे ग्रंथ-कोशकाला प्रधान हेतूचें काहीं दिसत नसले तरी समाज जीवनाचा ग्रंथ या दृष्टीनें त्यागत नाहीं कारण समकालीन ग्रंथांत उल्लेखित न झालेलें असें केवढें तरी समाजजीवन असतें आणि ग्रंथातील अनुल्लेखानें तें मरत नहीं तात्पर्य, गणेश देवतेचें सद्य स्वरूप अथर्वशीर्षात निश्चित झालें त्याच्या या स्वरूपाच्या घडणीचा वादग्रस्त इतिहास हा त्यापूर्वीच्या काळांतील आहे

नाहीं त्याचें श्रेष्ठ आध्यात्मिक स्वरूप हेंच प्रधान असतें आणि त्याबरोबरच तें स्वरूपहि घडत असतें गणेशाच्या बाह्य स्वरूपाबरोबरच त्याचें आध्यात्मिक स्वरूपहि घडत आलें तें केवळ मागाहून लावता येत नाहीं गणेशाच्या मूर्तीबरोबरच त्याचें आध्यात्मिक स्वरूपहि निर्माण झालें

अथर्ववेदाच्या काळात सिद्ध झालेलें गणपतीचें स्वरूप सर्वमान्य झालें तरी त्याचा पहिला मान इतका सहजासहजीं मान्य झाला नसेल महाभारतात आणि कालिदासाच्या काव्य-नाटकात त्याला वंदन केलेलें आढळत नाहीं याचा अर्थ एवढाच दिसतो महाभारताच्या लेखनासाठीं गणेश व्यास महर्षींचा लेखक झाला ही नंतर निर्माण झालेली आणि महाभारताला जोडलेली कथा आहे असें विद्वानांचें म्हणणें आहे तें मान्य करण्यास हरकत नाही पण या कथेचा स्पष्ट अर्थ असा कीं, नंतरच्या काळातहि गणेश नवीं नवीं क्षेत्रें पादाक्रांत करीत राहिला जैन आणि बौद्ध धर्मांतहि त्याने स्थान प्राप्त करून घेतलें तसा त्यांतहि तो पूज्य ठरला पुराणांची रचना म्हणजे त्यांचें अनेकवेळ संस्करण गुप्तकालाच्या आगमागें झालें, हें विद्वानांचें मत मान्य केलें तरी जैन, बौद्ध धर्मांत आणि तन्त्रशास्त्रात गणेशानें केलेला प्रवेश आणि मिळविलेलें स्थान हें त्यापूर्वीचेंच आहे गणेश ही देवता हिंदूधर्मात लोकप्रिय आणि सर्वमान्य होती म्हणूनच ती जैन आणि बौद्ध धर्मियांनीहि स्वीकारली असा तर्क करण्याशिवाय गत्यंतर नाहीं तन्त्रशास्त्र ही एक उपासना-पद्धति आहे तेव्हा गणेशाचा तन्त्रशास्त्रांतील प्रवेश हा गणेशाचें उपासना मार्गांतील त्यापूर्वीचें महात्म्य स्पष्ट करतो

गाणपत्ये असे गाणपत्याचे सहा संप्रदाय निर्माण झाले एका संप्रदायातून सहा उपसंप्रदाय निर्माण होण्याइतकी तो संप्रदाय किती वाढला असला पाहिजे याची कल्पना सहज करता येते गणेश-संप्रदायाच्या या वैभवकाळातच शिव-विष्णूंच्या स्वतंत्र मंदिराप्रमाणे गणेशाचीहि स्वतंत्र मंदिरे बांधण्याची प्रथा सुरू झाली असली पाहिजे चिदंबरम्जवळ उच्छी पिळैयार कोविल येथे गणेशाचे कोरीव लेणेच आहे

आद्य शंकराचार्यांच्या काळात गाणपत्यांचे हे षट्संप्रदाय प्रचलित होते कारण या संप्रदायाच्या आचारविचारांवर शंकराचार्यांनी वाद केल्याची माहिती शांकर-विजय ग्रंथात दिलेली आहे पंथोपपंथांची भाऊगर्दी आणि भेदाभेद मोडून काढून त्यांना एकत्र आणणे, त्यांच्यामध्ये एकसूत्रता निर्माण करणे हे आद्य शंकराचार्यांचे एक अवतारकार्य होते आणि त्यात गणेशाने त्यांना नवीच स्फूर्ति दिली असेहि म्हणायला हरकत नाहीं कारण शैववैष्णवांचे झगडे सौम्य करण्याचे कार्य यापूर्वीच गणेशाने हाती घेतले होते असे पुराणावरून दिसते गणेश हा शिवपुत्र तर खराच, पण तो विष्णूचा अवतार पार्वतीच्या पोटी जन्माला आला असे एक पुराण कथेने सांगितले म्हणजे गणेश हे शैव-वैष्णव पंथाचे मूर्तिमंत ऐक्यच म्हणायला पाहिजे ! पंथोपपंथांच्या एकीकरणाचा मार्ग म्हणून श्रीमत् शंकराचार्यांनी पंचायतन पूजा प्रवर्तित केली असे म्हणतात या पंचायतनात सूर्य, विष्णु, आणि शिव, देवी यांच्यामध्ये गणेशाची स्थापना शंकराचार्यांनी केली पंचायतनात गणेशाला स्थान देणे शंकराचार्यांना भाग पडावे इतके गणेश माहात्म्य त्या वेळीं आसेतुहिमाचल पसरले होते शिवाय सूर्य आणि विष्णु या आर्यांच्या देवता आणि शिव आणि देवी या आर्येतरांच्या देवता यांचा पंचायतनात संयोग करण्याची कामगिरीहि गणेशाकडेच त्यांनी दिली

गाणपत्यांचे षट् संप्रदाय काळाच्या ओघात नामशेष झाले पण गणेश मात्र समाजव्यापी झाला भारतातील सर्व पंथांनी त्याला पूज्य मानले, इतकेच नव्हे तर त्याचे पूजन प्रथमारंभीं सुरू केले काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत तो सर्व भारतात सारखीच मान्यता पावला त्यातहि महाराष्ट्रात गणेशाची मान्यता विशेष आहे हहि इतिहास क्रमाला धरूनच आहे उत्तर भारत किंवा आर्यावर्त आणि दाक्षिणात्य द्राविड देश मिळून भारत होतो. दक्षिण आणि उत्तर भारताचा

सयोग महाराष्ट्र भूमीने घडविला आहे. भारतीय संस्कृतीचें प्रतीक असलेल्या गणेशाचें महात्म्य महाराष्ट्रात असावें हें योग्यच आहे. राष्ट्रीय जागृतीला पोषक म्हणून सार्वजनिक गणेशोत्सवाचा पुनरुद्धार लोकमान्य टिळक यांनीं महाराष्ट्रात सुरू केला ही गोष्ट जमेला धरली तर वेदपूर्व कालपासून आजपर्यंत गणेशाचें भारतीय संस्कृतींतील कार्य अविच्छिन्न चालू आहे असें म्हणावें लागतें. उपासना मार्गांत गणेशाचें अध्यात्मिक स्वरूप हेंच प्रधान आहे. पण व्यवहारात ती सर्व-संग्राहक आणि विविधतेंतून एकता निर्माण करणाऱ्या भारतीय संस्कृतीचें प्रतीक आहे



## १६ तंत्रशास्त्रांतील विघ्नेश्वर

भारतीय संस्कृतीचें प्रतीक म्हणून गणेशाचें दर्शन घेतल्यानंतर त्याचें तंत्रशास्त्रांतील उपासना स्वरूप पाहिलें पाहिजे कारण या तंत्रशास्त्राच्या मार्गानें त्यानें बौद्ध जैन धर्मांत प्रवेश केला आणि भारताबाहेर पौर्वात्य देशात जाताना तंत्रशास्त्र हेंहि त्याचें एक वाहन होतें तंत्रशास्त्रात विघ्नराज गणेशाची मोठीच महती आहे तंत्रशास्त्राचं संपूर्ण स्वरूप अजून पंडितानाहि कळलेलें नाहीं कारण सर्व तंत्रग्रंथ अजून उपलब्ध झालेले नाहींत आणि उपलब्ध असलेले ग्रंथ बरेचसे दुर्बोध आहेत असें असलें तरी तंत्रशास्त्राबद्दल अनेक समजुती, गैरसमज आणि कल्पना निर्माण झालेल्या आहेतच

तंत्रामध्यें वामाचार, वाममार्ग आहे या वाममार्गात मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा आणि मैथुन अशा पंच मकारांचें महत्त्व आहे या पंच मकाराचे सूक्ष्म किंवा आध्यात्मिक अर्थ मागे राहिले आणि स्थूल अर्थ प्रचलित झाले त्यामुळें

अनाचार पसरले. साधनेच्या नावाखाली व्यभिचार आणि उपासनेच्या नावानें विषयवासना तृप्त करण्याचा हा मार्ग म्हणजे एक साधन आहे अशी तंत्रशास्त्राची निंदा होऊ लागली. अनेक ढोंगी लोकांना आपली भोगलालसा पुरी करण्याचा हा एक राजरोस मार्ग मिळाला ही गोष्ट खरी असली तरी तंत्रशास्त्र म्हणजे हा वाम मार्ग नव्हे; तो तंत्रशास्त्राचा दुरुपयोग आहे. तंत्रशास्त्र हा एक आध्यात्मिक उपासनेचा मार्ग आहे. तंत्र-ग्रंथाचा खरा अर्थ साधकानाच कळेल ते साधक तो अर्थ प्रगट करण्यास फारसे उत्सुक नसतात. आता तंत्रशास्त्राबद्दलच्या पूर्वीच्या गलिच्छ कल्पना हळू हळू कमी होत आहेत.

पाश्चात्य संशोधकाच्या मताप्रमाणें हें तंत्रशास्त्र फार प्राचीन म्हणजे आर्यपूर्वकालापासून भारतात प्रचलित आहे. म्हणजेच हा अनार्यांचा मूळ आचार आहे. फौचर यांचें तर असें मत आहे कीं, वैदिक, बौद्ध, जैन या धर्मांच्याहि पूर्वीचा आणि या धर्मांसारखाच तंत्र हा एक स्वतंत्र धर्म होता आणि पुढें तो या सर्व धर्मांना व्यापून राहिला. डॉ संपूर्णानंदाचें मत असें आहे कीं, तंत्र अतिप्राचीन आहे, त्याचा खुद्द वेदापर्यंत संबंध पोंचतो. बौद्ध कालानंतर या तंत्रशास्त्राचा अतिशय विकास झाला. 'रुद्रयामल' या तंत्रग्रंथात अशी कथा सांगितलेली आहे कीं, वसिष्ठ ऋषि आत्मज्ञानासाठीं व्याकुळ झाले. त्यांनीं गुरु शोधले, शास्त्रात सांगितलेली सर्व साधना केली तरीहि त्याना मन शांति मिळाली नाहीं. अखेर योगायोगानें ते महाचीनमध्यें गेले. तेथें त्याना लामा नावाचा महामुनी भेटला. त्यानीं वसिष्ठाना उपदेश देऊन मुक्त केलें. हाच उपदेश 'रुद्रयामल' ग्रंथात आहे. वसिष्ठाची ही कथा खरी असो किंवा नसो, तिबेटमध्यें धर्मपीठाचे आचार्य लामा आहेत. आणि तिबेटमध्यें प्रचलित असलेल्या महायान बौद्ध संप्रदायाची उपासना पद्धति तंत्रशास्त्रातील उपासना पद्धतीसारखीच आहे. या तंत्रशास्त्रातून बौद्धाच्या महायान संप्रदायात गणेश प्रगट झाले.

सर्व मंगल कार्यांच्या प्रारंभीं नवग्रह आणि मातृका यांच्या समवेत गणेश-पूजन केलें पाहिजे असा तंत्राचार्यांचा आदेश आहे. तंत्रशास्त्रात गुरुदीक्षा घेण्यापूर्वी एक दिवस गणपतीचें पूजन करावें लागतें. 'गं' हा गणेशाचा बीजमंत्र आहे. त्या बीजमंत्रानें प्रथम षडंगन्यास करावा लागतो. करन्यास आणि अंगन्यास करून हात आणि शरीर पवित्र करून मग प्राणायामपूर्वक गणपतीचें ध्यान करायाचें. हा ध्यानमंत्र असा:—सिंदूराभं त्रिनेत्रं पृथुतरजठरं हस्तपद्मैर्दधानम्।

खड्ग पाशांकुशेक्षुत्रुक्कर विलसत् वारुणीपूर्ण कुम्भम् । बालेंदुदीप्तमौलि करिपतिवदन बीजपूरार्द्र गण्डम् । भोगींद्राबद्धभूषं भजत गणपतिं रक्तवस्त्रांगरागम् ॥
शेंदूर वर्णाचा, तीन नेत्रांचा, विशाल उदर असलेला, लाल वस्त्र आणि नाग परिधान केलेला, ज्याच्या मस्तकावर बाल्चंद्र आहे आणि ज्याचें शरीर हत्तीचें असून त्याच्या कपोलांतून मद वहात आहे, त्याच्या हातात खड्ग, पाश, अंकुश, आणि मद्याचा कुंभ आहे अशा गणपतीचें भजन करा

गणपतीचें असें ध्यान केल्यानंतर गणेशाच्या शक्तींचें पूजन करावयाचें असतें. या शक्तींचीं नावें तीव्रा, ज्वालिनी, नदा, भोगदा, कामरूपिणी, उग्रा, तेजस्विनी, सत्या, आणि विघ्नविनाशिनी अशीं आहेत यानंतर गणपतीला पंचतत्त्वें म्हणजे मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा, मैथुन अर्पण केलीं जातात मग गणपतीच्या चार बाजूंना गणनायक, गणनाथ, गणक्रीड, एकदंत, रक्तमुंड, लंबोदर, गजानन, महोदर, विकट, धूम्राभ, आणि विघ्नाशन अशा गणपतीच्या विभूतींचें पूजन करावयाचें असतें नंतर अष्टमातृका आणि अष्टदिक्‌पाल यांची पूजा होते आणि शेवटीं ' विघ्नराज क्षमस्व ' असें म्हणून गणपतीचें विसर्जन केलें जातें

गणपतीपूजनानंतर मातृकांचें पूजन केलें जातें या अष्टमातृकांचा तंत्रशास्त्रात गणपतीशीं विशेष संबंध आहे अष्टमातृकांच्या मूर्तींबरोबर गणेशाचीहि मूर्ति खोदलेली असते अशा मूर्ति कोरीव लेण्यात सापडतात या अष्टमातृकाहि विघ्नकर आहेत पण त्यांचें पूजन केलें म्हणजे त्या संतुष्ट होऊन विघ्ननाश करतात विशेषत बालकांचें संरक्षण व्हावें म्हणून मातृकांची पूजा केली जाते.

अधकासुराच्या रक्तबिंदूपासून नवे अधकासुर निर्माण होऊं लागले तेव्हा त्यांचा वध करणें अशक्य होऊं लागलें त्यामुळें शंकराला क्रोध आला आणि त्याच्या मुखातून एक अग्निज्वाला देवी बनली हीच योगेश्वरी मग अशाच तऱ्हेनें माहेश्वरी, वैष्णवी, ब्राह्मी, कौमारी, ऐन्द्राणी, दण्डधारिणी आणि वाराही या मातृकांनीं शरीर धारण केलें अशी मातृकांची उत्पत्ति झाली. या मातृका मनुष्याच्या अंतःकरणातील दुष्ट प्रवृत्तींच्या अधिष्ठात्री देवता मानल्या जातात. योगेश्वरी कामाची, माहेश्वरी क्रोधाची, वैष्णवी लोभाची, ब्राह्मी मदाची, कौमारी मोहाची, ऐन्द्री मत्सराची, दण्डधारिणी पैशुन्याची आणि वाराही असूयेची अधिष्ठात्री देवता आहे दण्डधारिणीच्या ऐवजीं चामुंडा आणि

ऐन्द्राणीच्या ऐवजी अपराजिता अशींहि नावें कित्येक ठिकाणीं आहेत व्यापिनी, तापिनी, पाविनी, क्लेदिनी, धारिणी, मालिनी, हसिनी, शंखिनी, ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, इद्राणी, चामुडा, आणि महालक्ष्मी अशा सोळा मातृकाहि सांगितलेल्या आहेत

तन्त्रशास्त्रात जो वाममार्ग आहे त्यात गणपतीपूजनाच्या वेळीं गणपतीचीं जीं ध्यानें सांगितलीं आहेत तीं मैथुनाचेंहि स्वरूप दाखविणारीं आहेत ही अश्लील उपासना पद्धति आहे या गणपतीच्या ध्यानात गणपतीबरोबर त्याच्या पुष्टि आदि निरनिराळ्या शक्तीहि असतात त्यामुळें एका महागणपतीचे अनेक प्रकार झाले शारदातिलक ग्रथात एका महागणपतीच्या अशा प्रकारें २४, ५५ किंवा ४४० ध्यानमूर्ति वर्णन केलेल्या आहेत त्याचीं नावेंहि निरनिराळीं आहेत महागणाधिपति, कुमार गणपति हेरबसुत, नवनीत गणपति, स्वर्ण गणपति, सतान गणपति महागणपति, स्वर्ग गणपति, ऊर्ध्व गणपति, हरिद्रा गणपति, उच्छिष्ट गणपति, लक्ष्मी गणपति, पिंगल गणपति अशीं त्याचीं कांहीं नावें आहेत वाममार्गातील गणेशमूर्तीबरोबर त्याची शक्तीहि असते आणि अशा गणेशमूर्तींचें स्वरूप अश्लील असतें या मूर्तींना ‘ उच्छिष्ट गणपति ’ म्हणतात शक्तिसहीत ही गणेशमूर्ति बहुधा नग्न अशीच दाखविलेली असते उच्छिष्ट शब्दाचा अर्थ अपवित्र असाहि होतो

‘ ग ’ हा गणेशाचा बीजमत्र आहे पण गजानन, गणनाथ, गणनायक, गणपति, गणेश, गणेश्वर या नावाचे वेगवेगळे बीजमत्र तन्त्रग्रथातून दिलेले आहेत तन्त्रशास्त्रात एक चौर गणपति असून त्याचें माहात्म्य विशेषच वर्णन केलेलें आहे या चौर गणपतीचा चौर मन्त्र आहे हा मत्र जाणल्याशिवाय जो पुराण पठण करतो तो मूर्तिमंत कलीच होय तो पापी पुढच्या जन्मीं चोरटा कुत्रा होतो शिव, विष्णु शक्ति आदि देवताची जी पूजा होते तिचें तेज स्वत गणेश हरण करतो म्हणून प्रथम चौर मत्राचा जप करून मग आपल्या इष्ट देवतेचें पूजन करावें यामुळें महादि देवताच्या पूजेचें फल पूर्णपणें मिळतें चौर मत्र हा महामत्र आहे त्यामुळें पन्नास गणपति सतुष्ट होतात तन्त्रग्रथात या पन्नास गणपतींचीं आणि त्याच्या शक्तींचीं नावें दिलेलीं आहेत

पूजेच्या तेजाची चोरी कशी होते ? आपल्या शरीरात अकरा द्वारें आहेत दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या, तोंड, नाभि, लिंग, गुद आणि भ्रूमध्य

अशीं हीं अकरा द्वारें आहेत. या प्रत्येक स्थानाच्या ठिकाणीं मंत्राचे दहा दहा पाठ केले कीं तीं द्वारें बंद होतात आणि त्यांतून तेजाची चोरी करतां येत नाहीं. कोणत्याहि अनुष्ठानापूर्वी या चौर गणपतीचें पूजन केलें पाहिजे. फक्त गायत्री मंत्राच्या अनुष्ठानापूर्वी त्याचें पूजन करण्याचें कारण नाहीं.

शिव पूजा विष्णु पूजा शक्ति पूजा तथैवच ।
सर्व पूजासु यत्तेजो हरते गणप स्वयम् ॥
तस्मात् चौर प्रतोषार्थं चौर मंत्रान् जपेत्दश ।
ततस्तु पूजयेत् धीमान् यस्य या इष्ट देवता ।
सत. फलमवाप्नोति ब्रह्मादित्रिदिवौकसः ।
चौर मंत्रं महामंत्रं पश्चात् गणतोषणम् ॥

गणपति हा शिवाचा मानस पुत्र. तो पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश या पंचतत्त्वांनी साकार झाला. हीं पंचतत्त्वें विशिष्ट आकृतींनी दाखविलीं जातात. पृथ्वीतत्त्व काटकोन-चौकोनानें, आपतत्त्व (पाणी) वर्तुळानें, तेजतत्त्व (अग्नि) त्रिकोणानें, वायुतत्त्व अर्धचंद्राकृतीनें आणि आकाशतत्त्व ज्योतीच्या चिन्हानें दाखविलें जातें. ही प्राचीन पद्धति आहे. श्री यंत्राधारल्या यंत्रांत अशाच आकृति काढलेल्या असतात. हीं यंत्रें देवाचें स्वरूप मानतात. कोल्हापूरच्या महालक्ष्मीची स्थापना अशा श्री यंत्रावर केलेली आहे पृथ्वीपासून आकाश तत्त्वापर्यंतच्या या पांच आकृति एकावर एक काढल्या कीं गणेशयंत्र तयार होतें.

गुळाचा नैवेद्य समर्पावा. अंगारकी चतुर्थीचे दिवशीं सूर्योदयापूर्वी मांदाराचे झाडापाशीं जाऊन, 'ॐ वेतालाश्च पिशाचाश्च राक्षसाश्च सरीसृपाः। अपसर्पन्तु ते सर्वे वृक्षादस्मात् शिवाज्ञया ', हा मंत्र वेताळ पिशाच दूर होण्यास्तव उच्चारावा; आणि मग 'ॐ नमो अमृतसंभूते बलवीर्यविवर्धिनी। बलमायुश्च मे देहि पापान्मे त्राहि दूरतः' हा नमस्कार मंत्र म्हणून त्याची मुळी खणून आणावी. नंतर पंचगव्य, पंचामृताचा अभिषेक करून प्राणप्रतिष्ठा केल्यावर नित्यविधिवत् भक्ति-पूर्वक त्या मूर्तीची पूजा करीत गेलें असतां सकल विषयांचें ज्ञान होऊन धनधान्याची समृद्धि होते.

गणेशानें पूर्वी एकदा पृथ्वी प्रदक्षिणा केली होती त्यावेळीं त्या महाबुद्धि मतानें ईश्वर-पार्वतीस प्रदक्षिणा करून कार्तिकेयाला चकित केलें आणि त्यामुळें कार्तिकेयापूर्वी त्याचाच विवाह झाला ही पुराणातली पृथ्वीप्रदक्षिणा झाली इतिहासकालातहि त्यानें पृथ्वीप्रदक्षिणा केली आहे तो भारतातून निघाला आणि ब्रह्मदेश, सयाम, कंबोडिया, जावा, बाली बोर्निओ, तुर्कस्थान चीन जपान, इतकेंच नव्हे तर अमेरिकेंत कॅलिफोर्निओ, मेक्सिको इत्यादि देशात गेला अमेरिकेंतील गणेशाचें अस्तित्व विवाद्य आहे पण इतर देशांत गणेशाच्या असंख्य मूर्ति आहेत

आमेय आशियातील देशांत आजहि हिंदु संस्कृतीच अनेक रीतिरिवाज चालू आहेत त्या देशात एका काळीं हिंदु संस्कृतीच नांदत होती जगाच्या पाठीवर गणेश ज्या ज्या ठिकाणीं गेला तेथें तेथें तो हिंदु संस्कृति घेऊन गेला गणेशानें बौद्ध धर्म व्यापल्यानंतर त्या धर्माबरोबरहि तिबेट, तुर्कस्तान, चीन जपान या देशात गणेशानें संचार केला

ब्रह्मदेश हा भारताचा निकटचा शेजारी त्यामुळ तेथें गणेशमूर्ति विशेष सापडतात उत्तर ब्रह्मदेशात महायान बौद्ध धर्माचा प्रसार झाला आसाम पूर्व बंगाल, मणिपूर या प्रांतातून हिंदुधर्माचाहि उत्तर ब्रह्मदेशात प्रवेश झा । दक्षिण ब्रह्मदेशात बौद्ध धर्माचा हीनयान पथ प्रचलित असल्यामुळें तेथें बौद्ध धर्माबरोबर गणेशाचा संचार झाला नाहीं कारण हीनयान पंथात गणेशपूजन नाहीं पण प्राचीन काळापासून या भागात व्यवहार करणाऱ्या हिंदु व्यापाऱ्यांनीं तेथें गणेशमंदिरें बांधलीं आणि गणेशाची स्थापना केली ब्रह्मदेशात या गणेशाला महापिएन असें नाव आहे

सयाममधील लोक मंगोल वंशाचे आहेत आज त्यांचा धर्म बौद्ध असला तरी संस्कृति पूर्णपणें भारतीयच आहे पूर्वी वैदिक हिंदु धर्म हा तेथें राजधर्म होता सयामच्या राजाचा राज्याभिषेक आणि इतर काहीं संस्कार अजूनहि तेथ वैदिक पद्धतीनें होतात सयाममध्यें अनेक सुंदर गणेश मूर्ति आहेत सयामच्या पूर्वीच्या राजधानीचें नाव अयुथिया म्हणजे अयोध्या असें होतें त्यामुळें या मूर्तींच्या शिल्प पद्धतीला अयुथिअन असें म्हणतात

कंबोडियाचें पूर्वीचें नाव कबुज असें आहे या देशात मूर्ति विपुल आहेत या देशाची प्राचीन राजधानी अकुरवट येथें तर अतोनात मूर्ति आहेत येथील लोक बौद्ध असले तरी त्यांचे रीतिरिवाज बरेचसे हिंदु पद्धतीचे आहेत कंबोडियांतहि अनेक गणेशमूर्ति आहेत

मलायाद्वीपात अनेक गणेशमूर्ति आहेत. येथें पाषाणाच्या तशाच धातूच्याहि मूर्ति आढळतात सध्यांच्या इंडोनेशियामधील जावा बेटातहि अनेक गणेशमूर्ति आहेत एक मूर्ति तर इतकी सुंदर आहे कीं तशी सुंदर मूर्ति खुद्द भारतांतहि नाहीं असें म्हणतात जावामध्यें अनेक गणेशमूर्ति नदीच्या घाटावर आणि अन्य भयाण जागीं आहेत इंडोनेशियातील दुसरें एक बेट बाली बाली बेटातले लोक आजहि हिंदुधर्माचेच अनुयायी आहत बालीमध्यें राजाराणीचा मृत्यु झाला म्हणजे त्यांच्या मूर्ति बनवून त्या गणेशमूर्तींच्या उजव्या बाजूला स्थापन करतात येथें हिंदुलोक असल्यामुळें ते तेथें गणेशाचें पूजन करतात बोर्निओमध्यें गणेशमूर्ति आहेतच तेथें एक अतिशय उत्कृष्ट शिवमंदीरहि आहे

गणेश ही इतकी प्रभावी देवता आहे की ती हिंदु धर्मातून बौद्ध आणि जैन धर्मात गेली आणि तेथेंहि पूजनीय बनली. बौद्ध धर्माबरोबरच ती तुर्किस्तान, चीन, जपानमध्यें गेली. खुद्द गौतमबुद्धानें गणेश-माहात्म्य वर्णन केलेलें नाहीं असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. कारण पिटक ग्रंथात गणेशाचा उल्लेख नाहीं. बुद्धाच्या निर्वाणानंतर जो महायान पंथ निघाला त्यानें तंत्रशास्त्र स्वीकारलें आणि गणेशपूजाहि स्वीकारली.

महायान पंथाचे जे तंत्रग्रंथ आहेत ते खुद्द गौतमबुद्धानें आपल्या शिष्याना सांगितले असें त्या ग्रंथातच म्हटलेलें आहे. पण सर्व पुराणें व्यासांनीं रचलीं असें जसें म्हणतात तसेंच हें आहे; या तन्त्रग्रंथांत मंत्र सांगितलेले आहेत. मंजुश्री मूलकल्प या ग्रंथात दुष्ट स्वभावाचा परिहार करणारे मंत्र आहेत. त्यात महाक्रोधाला आवाहन केलें असून त्याचें वर्णन, विनायकाचा प्राण घेणारा असें केलेलें आहे. हे मंत्र म्हटले म्हणजे विघ्नविनायक भग्नहृदय होतो असें सांगितलें आहे. हा विनायक म्हणजे क्रूर विनायक गण आहे.

ही विनायकाची कथा झाली. गणेश ही देवता म्हणूनहि बौद्धांच्या तंत्रग्रंथात सांगितलेली आहे. बुद्धानें आपल्या आनद नांवाच्या प्रिय शिष्याला रहस्यमय असा गणपतिहृदय नावाचा मंत्र सांगितला, हा सिद्धिदाता मंत्र आहे असें 'साधनमाला' या तंत्रग्रंथांत सांगितलें आहे. या 'गणपतिहृदय' मंत्रात शेवटीं गणपतिशक्तीचें स्त्री स्वरूपांतहि आवाहन आहे

बौद्ध धर्माबरोबर गणेश भारताबाहेर अनेक देशात गेला. तेथें गणेश देवतेच्या पूज्य अशा अनेक मूर्ति सापडतात, तशाच कांहीं विचित्र मूर्तिहि आहेत. तिबेट, तुर्किस्तानमध्यें गणेशमूर्ति मठाच्या द्वारावर रक्षक म्हणून बसविलेली आहे. भृकुटी-तारा, पर्णेश्वरी, अपराजिता या देवी आणि महाकाल ही बौद्ध देवता गणेशावर पाय देऊन उभ्या आहेत, अशाहि मूर्ती तिबेट, तुर्किस्तान, चीनमध्यें सापडतात. बौद्ध आचार्य अशा मूर्तींचे आध्यात्मिक अर्थ सांगतात. तथापि, बौद्ध धर्माचा वैदिक किंवा हिंदु धर्मावर विजय दाखविण्याचा हेतु या मूर्तींच्या स्वरूपांत स्पष्ट दिसतो. म्हणजे बौद्ध आचार्य, गणेश ही सुरवातीला हिंदूंची

देवता म्हणून मानीत होते. पण तेच महायान बौद्ध अखेर 'गणपति-हृदय' मंत्रे म्हणून गणेशाची उपासना करूं लागले. म्हणजे शेवटीं गणेशानेंच बौद्धधर्म पादाक्रांत केला!

बौद्ध धर्माप्रमाणें जैनधर्मांतहि गणेश पूज्य ठरला. भगवान् जिनेंद्र यालाच जैन लोक गणेश आणि विनायक म्हणतात. विग्रह प्रसंगीं ते विनायक यंत्राची पूजा करतात. जिनेंद्र हाच गणेश; शिव-पार्वतीचा गजमुख पुत्र हा गणेश ही कल्पना कलियुगांत निर्माण झाली असें जैन म्हणतात. जिनेंद्र गणेश हा विघ्नहर्ता आहे अशी ते त्याची स्तुति करतात.

चिनी विद्वान भारतांत आले. नालंदासारख्या विद्यापीठांत शिकले आणि त्यांनीं बौद्ध धर्माबरोबर भारतीय संस्कृति आणि गणेश यांना आदरानें चीनमध्यें नेलें. याच्या उलट उत्कलचा राजा शुभाकरसिंह याच्यासारखे श्रेष्ठ भारतीय धर्मप्रचारक बनून चीनमध्यें गेले. मुसलमानी सत्ता भारतांत आल्यानंतर भारताचा चीनशीं असलेला हा संबंध खंडित झाला.

चीनमध्यें आणि जपानमध्यें गणेशाला कांगि-तेन म्हणतात. गजमुख असलेल्या स्त्री पुरुष प्रतिमा एकमेकांना दृढालिंगन देत आहेत असें या मूर्तीचें स्वरूप आहे. ही मूर्ति म्हणजे तंत्रशास्त्रांत गणेश आणि त्याची शक्ति यांचीं जीं ध्यानें वर्णन केलीं आहेत त्यांचेंच एक स्वरूप आहे. या वाममार्गाच्या उपासनेचा संप्रदाय चिनी सम्राट चेनत्सुंगनें आज्ञापत्र काढून बंद केला. तंत्रशास्त्रातील वाममार्गीय उपासना आज भारतांतहि नामशेषच झाली आहे.

कांगि-तेन या मूर्तीची उपासना दोन प्रकारें होत असे. एक बहिर्मुख उपासना; हिला गर्भधातु म्हणत. दुसरी आध्यात्मिक स्वरूपाची उपासना, याला वज्रधातु म्हणत. या उपासना-पद्धतीप्रमाणें मूर्तींनाहि तींच नांवें मिळालीं होतीं. या कांगितेन मूर्तींखेरीज वेगळ्या आणि स्वतंत्र गणेश मूर्तींचीहि उपासना चीन आणि जपानमध्यें होत होती.



## १९ प्रतिमा आणि क्षेत्रें

गणेशानें अनेक धर्म व्यापले, अनेक देश पादाक्रांत केले त्याची ही क्रीडा अनेक सहस्र वर्षें चालू असेल त्यामुळे हा गजानन अनेक भक्तांच्या अंतःकरणांत अनेक प्रकारें अवतीर्ण झाला ज्याच्या चित्तांत तो जसा साकार झाला तसें त्याचें वर्णन त्यांनी केलें चित्रकारांनी त्याची अनेक चित्रें काढलीं आणि रंगविलीं मूर्तिकारांनीं त्याला अनेक प्रकारच्या मूर्तींत साकार केलें गणेश मूर्तींची विविधता महागणपतीच्या वैभवाला साजेशीच आहे

गणेशाला प्राय एकच गजवदन असतें, पण पांच मुखांच्या गणेशमूर्ति हि आहेत काशीला ढुंढीराज गणपतीच्या नजीक पंचमुखी गणेशाचें छोटें मंदिर आहे ही गोष्ट मुखांची तीच हातांची गणेशाला चार हात असतात पण दोन हातांच्या, आठ हातांच्या, सोळा हातांच्या मूर्तींहि सापडतात तीन

शिरांच्या गणेश मूर्ती जपानमध्यें, तर चार मुखांच्या मूर्ति कंबोडियांत सांपडतात. तसाच रंग. गणपतीचा रक्तवर्ण आणि सिंदूर वर्ण प्रसिद्ध आहे. हरिद्रा गणपति पिंवळा असतो. पिंगट वर्णहि सांगितलेला आहे. पांढरा आणि काळया रंगाचे गणेशहि सांगितलेले आहेत. गणपतीला कधीं दोन डोळे दाखवितात, तर बहुधा त्याला तीन डोळेच असतात. त्याच्या गळयांत कधीं यज्ञोपवीतासारखा सर्प घातलेला असतो. कित्येकदां हा सर्प कमरेभोंवतीं गुंडाळलेला असतो. गणपतीच्या हातांत लाडू असतात, मोदक असतात, कधीं डाळींब, लिंबूहि असतें. त्याचीं शस्त्रास्त्रेंहि विविध आहेत. त्रिशूल, पाश, परशु, अंकुश, खेटक, खट्वांग, मुद्गर अशीं त्याचीं आयुधें आहेत.

उंदीर हें त्याचें नित्याचें वाहन. पण त्याचीं इतरहि वाहनें आहेत. हेरंब गणपतीचें वाहन सिंह आहे; मयूरेश्वराचें मोर आहे. गणेश कधीं सम मुद्रा धारण करतो; कधीं पद्मासन-स्थित असतो; तर कधीं ताण्डव नृत्यहि करीत असतो. उंदरावर उभा राहून नृत्य करीत असलेल्या गणपतीची मूर्ति नेपाळमध्यें सांपडली आहे. त्या उंदराच्या तोंडांत चिंतामणी आहे. तंत्रशास्त्रांतील शाक्त पंथांत पांच शक्ति-गणपतींचें पूजन करतात. उच्छिष्ट गणपति चतुर्भुज आणि रक्तवर्ण असतो. महागणपतीची मूर्ति दशभुज आणि रक्तवर्ण असते. ऊर्ध्व गणपती सहा हातांचा आणि पिंवळ्या रंगाचा असतो. पिंगल-गणपति सहा हातांचा पिंगट वर्णाचा असतो. लक्ष्मी-गणपति शुभ्र वर्णाचा असतो. त्याला चार किंवा आठ हात असतात. मलाया आणि जावामध्यें नरमुंडमाला धारण केलेल्या गणेशमूर्ति आहेत. त्यांच्या सिंहासनावरहि नरमुंडें खोदलेलीं आहेत. बाली बेटांत जमवरन् येथील मूर्ति वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्या मूर्तीच्या सिंहासनाच्या चारी बाजूंनीं दीपज्योति निघालेल्या दाखविलेल्या आहेत. या गणेशमूर्तीच्या हातांत मशाल आहे.

जगांतील सर्वांत विलक्षण गणेशमूर्ति मात्र भारतांतच आहे. ही मूर्ति म्हणजे हिमालयांतील 'मुंडकटा गणेश' ही होय. या मूर्तीला शिर नाहीं! तिची पूजा करतात. पण त्यावेळीं मूर्तीच्या छातीला गंध लावतात. पार्वतीनें आपल्या अंगाच्या मळापासून बनविलेल्या पुत्राचा शंकरानें शिरच्छेद केला या कथेतील मूर्ति आहे. या मूर्तीच्या पलिकडे गौरीकुंड आहे. हें पार्वतीचें स्नानगृह या कुंडांतील पाणी बायका अंग धुण्यासाठीं घेतात तितकें गरम असतें.

गणेशाच्या मृण्मय मूर्तीची पूजा होते हें सर्वांना माहीत आहे शिलेच्या आणि धातूच्याहि मूर्ति असतात पण याशिवाय आणखीहि अनेक स्वरूपांत गणेशाचें पूजन होत असतें दक्षिण भारतात गणेशाची पिळ्ळयार म्हणून पूजा करतात पिळ्ळयार हें एक यज्ञकुंड असून त्याचें त्रिकाल पूजन केलें जातें. श्रीमत् आद्य शंकराचार्यांनीं शिव, विष्णु सूर्य, देवी आणि गणेश अशा पाचहि देवतांचें एकीकरण करण्यासाठीं पंचायतन पूजा रूढ केली गणेश हा मध्यभागीं स्थापून विष्णु शिव, सूर्य आणि शक्ति या क्रमानें चार कोनात चार स्थापल्या म्हणजे तें गणेश-पंचायतन झालें या पंचायतनात गणेशाची धातूची मूर्ति ठेवतात किंवा नर्मदा गणपति ठेवतात नर्मदा गणपति हा तांबड्या रंगाचा गोल असतो हे दगड नर्मदेंत सापडतात हे नर्मदेंतले गोटे तांबडे कां झाले आणि गणपति म्हणून त्याना पवित्र आणि पूजनीय, कां मानतात याबद्दलची कथा मागें आलेली आहे

शिवशंकराच्याप्रमाणें गणेशाच्याहि लिंगमूर्तींचें पूजन करतात स्वयंभू आणि गाणपत्य लिंग असे दोन प्रकार आहेत स्वयंभू लिंग आपोआप निर्माण झालेलें असतें आणि महासिद्धिदायक म्हणून त्याचें माहात्म्यहि विशेष असतें या स्वयंभू लिंगाला शेंदूर फासलेला असतो या स्वयंभू मूर्ति सहाजिकच, डोंगर पर्वतावर, माळरानात, नदीकिनारीं उघड्यावर असतात क्वचित् कोणी मागाहून त्या मूर्तींवर मंदिर बांधलेलेंहि असतें अशीं प्रसिद्ध स्वयंभू लिंगें कश्मीरमध्यें विशेष आहेत आणि तेथें प्राचीन काळापासून यात्रा भरतात

कश्मीरमध्यें लिदर नदीच्या काठीं गणेशबल नावाचें खेडें आहे तें मोठें यात्रेचें ठिकाण आहे तेथें प्रचंड स्वयंभू लिंग असून तें शेंदूरचर्चित असतें चौदाव्या शतकात कश्मीरचा बादशहा शिकंदर बुतशिकन यानें अनेक हिंदु मंदिराचा विध्वंस केला हें गणेशबल येथील स्वयंभू लिंग भ्रष्ट करावें असेंहि त्याला वाटलें आणि आपली फौज घेऊन तो तेथें आला पण या स्वयंभू लिंगा तून मधमाशाची प्रचंड सेना बाहेर पडली आणि तिनें शिकंदर बुतशिकनच्या फौजेला मारून टाकलें। श्रीनगरजवळ हरिपर्वत येथें असेंच दुसरें एक प्रसिद्ध स्वयंभू लिंग आहे त्याला भीमस्वामी असे म्हणतात या स्वयंभू लिंगाचें स्वरूप गजवदनाशीं मिळतें जुळतें आहे कश्मीरचा राजा प्रवरसेन यानें प्रवरपूर नावाचें शहर वसविलें हा राजा मोठा भाविक होता त्यामुळें त्याचें हें प्रवरपूर

पहाण्यासाठीं भीमस्वामींनें आपलें मुख त्या शहराकडे वळविलें. पुढें शिकदर बुतशिकनची स्वारी झाली त्यावेळीं त्याचा नाश करण्यासाठीं या मूर्तीनें प्रवरपुराकडून पुन्हा दुसरीकडे तोंड वळवलें. कश्मीरमध्येंच किशनगंगेच्या काठीं आणखी एक प्रसिद्ध स्वयभू लिंग आहे हें लिंग पन्नास फूट उंचीचें प्रचड असून तें थेट गजशुंडेसारखें दिसतें. या डोंगराला गणेशघाटी असे म्हणतात

दुसऱ्या प्रकारच्या लिंगाना गाणपत्य लिंगें म्हणतात. हीं गाणपत्य लिंगें बीजपुराच्या म्हणजे डाळिंबाच्या किंवा लिंबाच्या, कुष्माड म्हणजे कोहळ्याच्या आणि जम्बू फळाच्या आकाराचीं असतात. ज्या मदिरात स्वयंभू आणि गाणपत्य अशीं दोन्ही प्रकारचीं लिंगें असतात, तेथें स्वयभू लिंग गर्भगृहात असतें. त्याचें दर्शन कोणाला घेता येत नाहीं. भक्ताना फक्त गाणपत्य लिंगाचें दर्शन घेता येतें.

गणेशाचीं अनेक पवित्र स्थानें आहेत स्थानमहात्म्य म्हणून या गणेशाचें दर्शन अधिक पुण्यप्रद आणि सिद्धिदायक मानतात 'कलौ चडी विनायकौ' असें म्हणतात म्हणजे कलियुगात चडिका आणि गणेश याच देवतांचें विशेष माहात्म्य आहे काशीक्षेत्रात ढुढी विनायक आहे काशीविश्वेश्वराच्या सभोंवार आठ आवरणात छप्पन्न विनायक असून ते केवळ स्मरणानेच सर्व सिद्धि देतात. गणेश पुराणातील या छप्पन्न विनायकाचीं नावें मागें दिलेलीं आहेत.

ज्ञानदेवानीं ज्ञानेश्वरींत षड्भुज गणेशाचें स्तवन केलेलें आहे हें ध्यान केवळ काल्पनिक नसून तें त्रेतायुगातील गणेश अवताराचें स्वरूप आहे असें गणेशपुराणावरून दिसून येतें. त्याचा शुभ्रवर्ण होता. ज्ञानदेवानींहि आपल्या गणेशाचा समता–शुभ्रवर्णच सागितला आहे कागडा जिल्ह्यात वैजनाथ गावीं वैद्यनाथाचें एक मदीर आहे १९०५ सालच्या धरणीकपात येथील अनेक वास्तु उध्वस्त झाले. पण हें मदिर बचावलें या मदिरात सहा भुजाचा गणेश आहे हें मदीर प्रत्यक्ष पाहून त्याचें वर्णन भारताचार्य वैद्यानीं भारत इतिहास सशोधक मडळाच्या त्रैमासिकात केलें आहे त्यानतर षड्भुज मूर्तींचा शोध इतरत्रहि लागला रावणानें गणपतीच्या डोक्यावर मुष्टी प्रहार केल्याची गोष्ट मागें गोकर्ण लिंगाच्या सदर्भात आलेली आहे गोकर्ण येथें द्विभुज महागणपतीची मूर्ति असून त्या मूर्तीच्या डोक्यावर या रावणाच्या मुष्टी–प्रहाराची खूण अजून दाखवितात तामिळनाडमध्यें गणपतीला 'पुत्रिमाई अप्पर' म्हणजे बुद्धिमान

गणेश असें म्हणतात. त्रिचनापल्ली येथें " उच्चि पिलेयार " नावाचें कोरीव लेण्यातील एक गणेश मंदीर आहे. या गणेशाला ऋद्धि आणि सिद्धि अशा दोन बायका असून मयूर हें त्याचें वाहनहि गणेश–मूर्तीच्या पुढें आहे.

नेपाळांतील लोडी विनायक, हिमालयांतील मुंडकटा गणेश येथपासून रामेश्वरासमोर असलेल्या गणेशापर्यंत सबंध भारतात गणेशाचीं लहानमोठीं सहस्रावधि स्थानें असलीं तर त्यांत काय आश्चर्य आहे?

महाराष्ट्रांतहि गणपतीचीं स्थानें खूप आहेत. गणेशाचे महोत्कट, गुणेश आणि गणेश हे तीन अवतार परळीवैजनाथ येथें झाले असें परळी माहात्म्यांत म्हटलें आहे. परळीला या तीन अवतारांचीं तीन देवळें आहेत. नागपूर जिल्ह्यांत आदासा येथें वामनावतारात श्रीविष्णूनें स्थापन केलेली चिंतामणि गणपतीची मूर्ति आहे. ही मूर्ति ६॥ फूट उंच आहे. या मूर्तीमुळें या गावाला अदोषक्षेत्र म्हणतात. विदर्भाचा उल्लेख गणेश पुराणांत वारंवार सांपडतो. विदर्भांत आज सापडणारीं कळंब, सिद्धेवेड हीं गावें म्हणजेच गणेश पुराणात सांगितलेलीं कदंबक्षेत्र, सिद्धक्षेत्र हीं स्थानें होत असें म्हणतात. विदर्भांत तिवरी नांवाचें एक गांव असून तेथें मंदिराचे प्राचीन अवशेष, चिंतामणी गणेशाची उत्कृष्ट मूर्ति आणि गणेशाच्या इतरहि मूर्ति सांपडतात. त्यामुळें त्रिपुरासुराची त्रिपुरी हीच असावी असाहि तर्क कित्येकानीं केला आहे.

चिंचवड येथें मोरगांवचे मोरया गोसावी यानीं तपश्चर्येनें सिद्ध केलेलें गणेशक्षेत्र आहे. मोरया गोसाव्यांना पवना नदींत मिळालेली गणेशमूर्ति चिंचवड येथें त्यांनीं स्थापन केलेली आहे. रत्नागिरी जिल्ह्यात गणपतिपुळें हें असेंच एक प्रसिद्ध क्षेत्र आहे. हें एक रम्य स्थळ आहे. या ठिकाणीं बापट नावाच्या गणेशभक्ताला केतकीच्या बनांत गणेश स्थान असल्याचा दृष्टांत झाला. बापटांनीं तें केतकी बन तोडलें. तेथील टेंकडी हीच गणेशरूप आहे. सांगलीच्या पटवर्धनांचे पूर्वज हरभट यांनीं याच ठिकाणीं गणेश-उपासना केली होती. हेदवी येथें दशभुज गणेशाचें मंदिर असून तें तीनशें वर्षांपूर्वी केळकर नांवाच्या सिद्ध पुरुषानें स्थापन केलें आहे.

महाराष्ट्रात अष्ट सिद्धिविनायकाचीं स्थानें अशींच प्रसिद्ध आहेत. गणेश पुराणांत ज्या कथा दिलेल्या आहेत त्यावरून हीं गणेशस्थानें महाराष्ट्राबाहेर सिंध,

बंगाल अशा ठिकाणीं असलीं पाहिजेत पण मराठी लोकांना तीं कुलाबा, पुणें नगर या तीन जिल्ह्यांतच! उपलब्ध झालेलीं आहेत. विवाहासारख्या मंगल प्रसंगीं या अष्टसिद्धिविनायकाचा एक श्लोकच मंगलाष्टकांत म्हणतात महाराष्ट्रातील अष्टविनायक स्थानाबद्दल विद्वानांचें मत असें आहे कीं, 'हीं अष्टविनायकाचीं स्थानें खरोखर एकमेकाजवळच आहेत. तेव्हां या लहानशा टापूची माहिती असलेल्या एखाद्या चाणाक्ष माणसानें आपल्या परिचयाच्या आठ गणपतींची श्लोकबद्ध यादी करून ठेवताना 'विनायक' हा शब्द सामान्य अर्थानेंच वापरला असताना पुढें त्याला अष्ट हा केवळ संख्यावाचक शब्द जोडून विशेष महत्त्व परपरेनें आणि नकळत आलें असावें. हा श्लोक काहींसा असंस्कृतच आहे.' अष्ट विनायक स्थानाबद्दलचा हा श्लोक आणि त्या स्थानाबद्दलची माहिती अशी —

स्वस्ति श्रीगणनायक गजमुखं मोरेश्वरं सिद्धिदं ।
बल्लाळ मुरुड विनायक मढं चिंतामणिं स्थेवरं ॥
लेण्याद्रिं गिरिजात्मजं सुवरदं विघ्नेश्वरं ओझर ।
ग्रामे राजण संस्थिते गणपति कुर्यात सदा मंगलं ॥ १ ॥

**श्रीमोरेश्वर** विनायक जेजुरीजवळ मोरगाव येथें आहे. कमलासुराला मारण्यासाठीं गणेशानें घेतलेला अवतार मागें वर्णन केला आहे. त्या मोरेश्वराला मयूर हें वाहन येथें प्राप्त झालें असें म्हणतात

**श्रीसिद्धिविनायकाचें** स्थान डिक्साळ स्टेशनाजवळ सिद्धटेक येथें आहे. येथें गणपतीचें दगडी देवालय आहे विष्णूनें मधुकैटभ नावाच्या असुराना मारण्यापूर्वी येथें तपश्चर्या केली होती असें म्हणतात.

**श्रीवल्लाळेश्वर** हें स्थान कुलाबा जिल्ह्यात नागोठण्याजवळ पाली येथें आहे येथील बल्लाळ मूर्ती स्वयभू आहे बल्लाळ नावाच्या मुलानें रानात शमी वृक्षाखालीं केलेली गणपतीची पूजा त्याच्या बापानें मोडली आणि बल्लाळाला खूप मार दिला तेव्हा गणेशमूर्ति प्रगट झाली ही बल्लाळेश्वराची कथा गणेश-पुराणात दिलेली आहे. पण ही कथा सिंधु देशात पल्ली गावीं घडली असेंहि तेथें म्हटलें आहे

**श्रीवरदविनायक** हें स्थान कुलाबा जिल्ह्यात खोपोलीजवळ महड या गावीं आहे. मागें गृत्समद ऋषीची कथा दिली आहेच. त्या गृत्समदानें येथील वनात घोर तपश्चर्या करून 'गणानात्वा' हा मत्र सिद्ध केला असें म्हणतात

**श्रीचिंतामणी** विनायक हें स्थान थेऊर गावीं आहे इंद्राला अहल्येशीं केलेल्या पापकर्माबद्दल मिळालेला शाप त्यानें येथें तपश्चर्या केल्यानंतर नाहींसा झाला अशी कथा आहे या ठिकाणीं थोरल्या माधवराव पेशव्यानीं देह ठेवला आणि त्याची पत्नी रमाबाई येथेंच सती गेली

**श्रीगिरिजात्मज** विनायकाचें स्थान जुन्नरजवळ लेण्याद्रि या डोंगरात आहे सिंधु दैत्याचा नाश व्हावा म्हणून पार्वतीनें या डोंगराच्या गुहेंत तपश्चर्या केली त्यामुळ पार्थिव मूर्तीतून गजानन प्रसन्न झाले अशी येथील कथा आहे या डोंगराच्या मागील बाजूला खोदलेली एक मूर्ति आहे त्याची गिरिजात्मज म्हणून पूजा करतात

**श्रीविघ्नेश्वर** विनायक पुणें जिल्ह्यातील खेड तालुक्यात ओझर या गावीं आहे हें अतिशय रम्य स्थान आहे या ठिकाणीं गणेशानें विघ्नायक नावाच्या राक्षसाचा वध केला अशी कथा आहे

**श्रीगणपति** विनायकाचें स्थान उरळी स्टेशनापासून जवळच राजणगावीं आहे त्रिपुरासुराचा नाश व्हावा म्हणून शंकरानें येथें तपश्चर्या केली हा त्रिपुरासुर गृत्समदाच्या शिंकेपासून निर्माण झाला होता त्याचें गणेशपुर बगाल्मध्यें आहे



## २० गणेशाचें ब्रह्मस्वरूप

गणेशाचें स्वरूप ऐतिहासिक दृष्टीनें कसें सिद्ध होतें किंवा त्याच्या स्वरूपाचा ऐतिहासिक अर्थ कसा लागतो याचें गणेश उपासकांना मुळींच महत्त्व वाटत नाहीं गणेशाचें जें आध्यात्मिक किंवा ब्रह्मस्वरूप आहे तेंच खरें महत्त्वाचें आहे असें ते उपासक मानतात आणि एका अर्थी तें योग्यच आहे कारण देवतेचें आध्यात्मिक स्वरूप हेंच प्रधान असतें त्यातच तिचें देवत्व असतें ऐतिहासिक दृष्टि स्वीकारणारहि हें आध्यात्मिक स्वरूप अमान्य करू शकत नाहींत कारण तें सिद्धच असतें पण त्याच्या विवेचनात एक गफलत झालेली आढळते गणेशाचें ऐतिहासिक स्वरूप आधीं तयार झालें आणि त्याचें

उदात्तीकरण करण्यासाठी उच्च आध्यात्मिक स्वरूप त्याच्यावर मागाहून लादल गेलें असें ते मानतात पण हें तर्काशीं विसगत आहे

गणेश देवतेच्या ऐतिहासिक आणि आध्यात्मिक स्वरूपाचा विकास एक समयावच्छेदेंकरून झाला असला पाहिजे जसा उपासक असेल तसें त्याला देवतेचें स्वरूप दिसेल गणेशाचें स्वरूप प्रारभीं भिन्न भिन्न लोकजातींना वेग वेगळें दिसलें असेल पण ते सगळे त्याला देवच मानीत होते ईश्वराच्या स्वरूपा बद्दल त्या लोकजातींचा विचार जेवढा विकसित असेल जेवढ्या पातळीवर असेल तेवढें गणेश स्वरूप त्याना दिसलें पण यामुळें गणेशाच्या श्रेष्ठ आध्यात्मिक स्वरूपाला बाध येऊ शकत नाहीं आदिवासींच्या एका गाण्यातहि गणेशाचें हें अनादि स्वरुप आढळतें 'गणेश हा शिव पार्वतीचा मुलगा असें तुम्ही म्हणता मग शकर पार्वतीच्या लग्नात गणेश पूजन कसें केलें ! ' असा त्याच्या गाण्यात सवाल आहे गणपति पूजन केल्याशिवाय शकर पार्वतीचाहि विवाह झाला नाहीं ! म्हणून त्यावेळीं नारळ ठेवून त्याचें गणपति पूजन केलें, नारळाला सोंड असतेच असें त्याचें त्या गाण्यातच उत्तर दिलेलें आहे आजचें गणपतीचें बाह्य स्वरूप जसें अथर्वशीर्षात व्यक्त झालें आहे तसेंच त्याचें श्रेष्ठ आध्यात्मिक स्वरूपहि तेथें प्रगट झालेलें दिसतें

गणपति अथर्वशीर्षात गणेशाचें आध्यात्मिक स्वरूप सर्व प्रकारें सागितलें आहे 'तू तत्त्व आहेस, तू प्रत्यक्ष ब्रह्म आहेस तू आत्मा आहेस, तू ज्ञानमय आणि विज्ञानमय असा आहेस ' असें गणेशाचं आवाहन केलेलें आहे तत्रशास्त्रांतील गणेश-यत्राची माहिती मागें आली आहे अथर्वशीर्षातहि तें वर्णन आहे 'तू भूमि, आप, तेज, वायु आणि आकाश आहेस ' असें तेथें म्हटलेलें आह 'त्वमेव सर्वं खल्विद ब्रह्मासि ' 'सर्वं खल्विद ब्रह्म ' या श्रुतीनें ज्या सकलव्यापी ब्रह्माचें वर्णन केलें आहे तें ब्रह्म तू आहेस इतकें सागितल्यावर जगाचा कर्ता, धर्ता, हर्ता तू गणेशच आहेस हें वेगळें सागण्याचें कारण नव्हतें पण तेंहि सागितेलें आहे कारण येथें गणेशाच्या स्वरूपाचा सर्वांगीण साक्षात्कार व्हावयाचा आहे म्हणून पुढें 'त्वम् वाङ्मय , त्वम् चिन्मय , त्वम् आनदमय , त्वम् सत् चित् , आनदमय ' असेंहि सागितलें आहे

उपासनेच्या पद्धतींचा निरनिराळया स्वरूपात जसजसा विकास होत गला तसतसा त्या त्या उपासनेच्या स्वरूपातहि गणेशाचा साक्षात्कार साधकाना होत

गेला. 'त्वं चत्वारि वाक् पदानि.' परा, पश्यन्ति, मध्यमा आणि वैखरी अशा चार वाचा मानलेल्या आहेत. वैखरीनें आपण बोलतों. त्याच क्रमानें या चार वाणींचीं स्थानें बेंबीपर्यंत मानलेलीं आहेत. गणेश हा या चारहि वाचांचें स्वरूप आहे. तो गुणत्रयातीत म्हणजे सत्व, रज, आणि तम याच्या पलिकडचा आहे. गुणत्रयातीत, देहत्रयातीत, कालत्रयातीत असा हा गणेश आहे. तरीहि तो ब्रह्मा, विष्णु, रुद्र, इंद्र, अग्नि, वायु सूर्य, चंद्र आणि अखेर ॐकार स्वरूपहि आहे. गणेश योगशास्त्रातहि आहेच 'त्वं मूलाधारस्थितोसि नित्यम्' असें म्हटलें आहे चित्तवृत्तींचा निरोध करून एकाग्रता प्राप्त करण्यासाठीं योगशास्त्र आहे. योगशास्त्राच्या अभ्यासानें समाधि लावता येते या योगशास्त्रात मूलाधार स्वाधिष्ठान, मणिपूरक, अनाहत, विशुद्ध आणि आज्ञाचक्र अशीं सहा चक्रें मानलीं आहेत गुदद्वाराच्या वर आणि जननेंद्रियाच्या खालीं जी शिवण असते तेथें हें मूलाधारचक्र मानलेलें असून तेथून ब्रह्मरंध्रापर्यंत सहा चक्राचीं स्थानें आहेत. योगशास्त्र हा अनुभवाचा विषय आहे. मूलाधार चक्राची गणेश ही देवता आहे. 'मूलचक्र गनेसबासा रक्तबरन जहँ जानिये' असें त्याचें वर्णन आहे. मूलाधार चक्राची गणेश ही देवता मानण्याची परंपरा मागून निर्माण झाली असेंहि विद्वानांचें म्हणणें आहेच पण 'गणेश्वरो विधिर्विष्णु शिवो, जीवो गुरुस्तथा। षडते हस्तामेत्य, मूलाधारादिषु स्थिताः' असेंच आज सर्वत्र मानलें जातें.

गणेश-उपासना हिंदुधर्माप्रमाणें बौद्ध जैन धर्मांतहि गेली आणि तेथें तिला असेंच उच्च आध्यात्मिक स्वरूप प्राप्त झालें तंत्रशास्त्रात, शाक्तमार्गात गणेश-उपासना गेली. उपासकाची जी पातळी असेल त्या पातळीवर ते गणेश-स्वरूप आपल्या स्वभावाप्रमाणें आणि रुचीप्रमाणें पाहू लागले

गणेशाची उपासना जसजशी उच्च आध्यात्मिक पातळीवरून होऊं लागली तसतशी गणेशमूर्ति हें परब्रह्म स्वरूप आहे असा साक्षात्कार उपासकांना होऊं लागला गणेशाचा एकदंत हा अद्वैताचा सूचक आहे, त्याच्या उदरात अनेक ब्रह्मांडें असल्यामुळें तो लंबोदर आहे. ब्रह्मानंदस्वरूप जो मोद-क तो त्या गणेशाला प्रिय आहे असें त्याचें स्वरूप दिसू लागलें

मग गणेशाच्या निरनिराळ्या नावांची आध्यात्मिक उत्पत्ति लावण्यात येऊं लागली. गणेशाच्या स्वरूपावर, त्याच्या कथांवर आध्यात्मिक रूपकें बसविण्यात

आली अशीं काहीं रूपकें या पूर्वी सांगितलेलीच आहेत आता गणेश नामावर बसविलेल्या काहीं उपपत्ति पाहू

मुद्‌गल पुराणात सांगितलें आहे कीं, ज्याच्यापासून सर्व उत्पन्न होतें व ज्याच्या ठिकाणीं सर्वांचा लय होतो, पण जें स्वतः कधीहि उत्पन्न होत नाहीं आणि ज्याचा कधीहि लय होत नाहीं तें 'गज' नावाचें ब्रह्म वेदात वर्णन केलेलें आहे 'ग' म्हणजे जेथें सर्वांचा लय होतो तें तत्त्व होय आणि 'ज' म्हणज ज्याच्यापासून सर्वांचा जन्म होतो तें तत्त्व होय असें हें 'गज' नामक ब्रह्म आहे हें 'गज' रूपी ब्रह्मच गणेशाचें मस्तक आहे शरीराच्या डाव्या अंगात राजस, उजव्या अंगात तामस आणि मध्यें सात्त्विक गुण असतो या तीन गुणांच्या संयोगानें शरीराचा चौथा भाग तयार होतो अशा तऱ्हेनें चार प्रकारें बनलेल्या या देहावर गज रूपी मस्तक ठेवलें म्हणजे गणपति साकार होतो

चिंतामणि हें गणेशाचें एक नाव आहे क्षिप्त मूढ विक्षिप्त, एकाग्र, आणि निरोधक असे चित्ताचे पाच प्रकार आहेत चित्ताच्या या पाच भूमिकांना प्रकाशित करणारा तो 'चिंतामणि' होय चिंतामणीच्या भजनानें या चित्त पंचकाचा नाश होऊन पूर्ण शांतीचा लाभ होतो अशी 'चिंतामणि' नावाची उपपत्ति मुद्‌गल पुराणात दिलेली आहे

गणेश शब्दाची अन्यत्र अशीच मोठी सुंदर उपपत्ति दिलेली आढळते:—
ज्ञानार्थं वाचकोगश्च, णश्च निर्वाण वाचक । तयोरीश पर ब्रह्म, गणेश प्रणमाम्यहम् ।

'ग' ज्ञानार्थवाचक असून 'ण' निर्वाणवाचक आहे ज्ञान-निर्वाणवाचक गणाचा ईश परब्रह्म आहे त्या गणेशाला मी वंदन करतों

## २१ मंगलारति

आतां मंगलमूर्ति श्रीगणेशाची मंगलारति करावयाची आहे. आणि ती ऋषींच्या आणि साधुसंतांच्या शब्दांत करणेंच योग्य आहे. म्हणून प्रथम पुराणांतील गणेश-स्तुतीचे पांच श्लोक देऊन नंतर श्री ज्ञानदेव महाराज, एकनाथ महाराज आणि समर्थ रामदास यांनी केलेलें गणेश-वंदन सादर करतों.

नमस्तस्मै गणेशाय सर्वविघ्न विनाशिने।
कार्यारंभेषु सर्वेषु पूजितो यः सुरैरपि ॥ १ ॥
ॐ कारस्पी भगवान् यो वेदादौ प्रतिष्ठितः।
यं सदा मुनयो देवाः स्मरन्तीन्द्रादयो हृदि ॥ २ ॥
लंबोदर नमस्तुभ्यं सततं मोदकप्रिय।
निर्विघ्नं कुरु मे देव सर्व कार्येषु सर्वदा ॥ ३ ॥
गजाननं भूतगणाधि सेवितं। कपित्थजम्बूफलसारभक्षितम् ॥
उमासुतं शोकविनाशकारणम्। नमामि विघ्नेश्वर पादपंकजम् ॥ ४ ॥

ध्यायेत् सिंहगतं विनायकममुम् षड्बाहुकं सिद्धिदम्। द्वापारे तु गजाननं युगभुजं रक्तांगरागं विभुं तुर्ये तु द्विभुजं सितांगरुचिरं सर्वार्थदं सर्वदा ॥ ५ ॥

श्री ज्ञानदेव महाराज म्हणतातः—

॥ १० ॥ तरी तर्कु तोचि परशु । नीति भेदु अंकुशु । वेदांतु तो महारसु । मोदकु मिरवे ॥ ११ ॥ एके हातीं दंतु । जो स्वभावें खंडितु । तो बौद्धमत संकेतु । वार्तिकांचा ॥ १२ ॥ मग सहजें सत्कारवादु । तो पद्मकरु वरदु । धर्मप्रतिष्ठा तो सिध्दु । अभयहस्तु ॥ १३ ॥ देखा विवेकवंतु सुविमळु । तोचि शुंडादंडु सरळु । जेथ परमानंदु केवळु । महासुखाचा ॥ १४ ॥ तरी संवादु तोचि दशनु । जो समता शुभ्रवर्णु । देवो उन्मेषसूक्ष्मेक्षणु । विघ्नराजु ॥ १५ ॥ मज अवगमलिया दोन्ही । मीमांसा श्रवणस्थानीं । बोधमदामृत मुनी । अलि सेविती ॥ १६ ॥ प्रमेय प्रवाल सुप्रभ । द्वैताद्वैत तेचि निकुंभ । सरिसेपणें एकवटत इभ-मस्तकावरी ॥ १७ ॥ उपरि दशोपनिषदें । जियें उदारें ज्ञानमकरंदें । तियें कुसुमें मुकुटीं सुगंधें । शोभती भलीं ॥ १८ ॥ अकार चरण युगुल । उकार उदर विशाल । मकार महामंडल मस्तकाकारें ॥ १९ ॥ हे तीन्ही एकवटले । तेथ शब्द ब्रह्म कवळलें । तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें । आदिबीज ॥ २० ॥

एकनाथ महाराज म्हणतात —

नमन श्री एकदंता । एकपणे तूंचि आता । एकीं दाविसी अनेकता । परी एकात्मता न मोडे ॥ तुजमाजी वासु चराचरा । म्हणोनी बोलीजे लंबोदरा । या लागीं सकळांचा सोयरा । साचोकारा तू होसी ॥ सूक्ष्माहुनि सूक्ष्म सान । त्या माजीं तुझें अधिष्ठान । या लागीं मूषक वाहन । नामाभिधान तुज साजे ॥ हरुष तें वदन गणराजा । चाऱ्ही पुरुषार्थ त्याची चाऱ्ही भुजा । प्रकाशित प्रकाशी वोजा । तो झळकत तुझा निजदंतु ॥

समर्थ रामदास म्हणतात —

ॐ नमोजी गणनायका । सर्वसिद्धिफळदायका । अज्ञानभ्रांति छेदका । बोध रूपा ॥ १ ॥ येता कृपची निज उडी । विघ्नें पळती बापुडीं । होऊनी जाती देशधडी । नाममात्रें ॥ ४ ॥ वदूनिया मंगळनिधी । कार्य करिता सर्वसिद्धी । आघात अडथळे उपाधी । बाधू सकेना ॥ ६ ॥ जयाचें आठविता ध्यान । वाटे परम समाधान । नेत्रीं रिघोनियां मन । पांगुळे सर्वांगीं ॥ ७ ॥ भव्यरूप वितंड । भीममूर्ति महा प्रचंड । विस्तीर्ण मस्तकीं उदंड । सिंदूर चर्चिला ॥ १० ॥ नाना सुगंध परिमळें । थबथबां गळती गंडस्थळें । तेथें आलीं षट्पदकुळें । झुंकार शब्दें ॥ ११ ॥ मुर्डीव शुंडादंड सरळ । शोभे अभिनव आवाळ । लवित अधर

तीक्ष्ण गळे। क्षणक्षणा मदस्त्रवी ॥ १२ ॥ चौदा विद्यांचा गोसावी। ऱ्हस्व लोचन ते हिलावी। ल्वलवित फल्कावी। फडे फडै कर्ण थापा ॥ १३ ॥ रत्न खचित मुगुटीं झळाळ। नाना सुरंग फाकती कीळ। कुंडलें तळपती नीळ। वरी जडिलें झमकती ॥ १४ ॥ दंत शुभ्र सद्द्ट। रत्न खचित हेमकट्ट। तया तळवटीं पत्रें नीट। तळपती लघुलघु ॥ १५ ॥ ल्वथवित मलपे दोंद। वेष्टित कट्ट नागबंद। क्षुद्र घंटिका मंद मंद। वाजती झणत्कारें ॥ १६ ॥ नट नाट्य कळाकुसरी। नाना छंदें नृत्य करी। टाळ मृदंग भरोवरी। उपांग हुंकारे ॥ २१ ॥ स्थिरता नाहीं एकक्षण। चपळविषयीं अग्रगण्य। साजिरी मूर्ति सुलक्षण। लावण्यखाणी ॥ २२ ॥ ऐसा सर्वांग सुंदर। सकळ विद्यांचा आगर। त्यासी माझा नमस्कार। साष्टांग भावें ॥ २५ ॥ ध्यान गणेशाचें वर्णितां। मतिप्रकाश होय भ्राता। गुणानुवाद श्रवण करितां। वोळे सरस्वती ॥ २६ ॥

